श्रीमंत होळकर सरकारच्या जाहिरातीवरून.

# संगीत मेघदूत नाटक.

---

हें

महाकवी कालिदासकृत

मेघदूताच्या आधारें

गजानन चिंतामण देव.

यांनीं तयार केलें.

तें

भास्कर नारायण गोडबोले.

बुकसेलर पुणें

यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

---

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

महाकवि कालिदासकृत मेघदूताच्या आधारानें संगीत नाटक करण्याविषयीं गेले वर्षी श्रीमंत होळकरसरकार यांची जाहिरात लागली होती. त्यावरून मी हें नाटक यथामतीनें संगितांत तयार करून तें अनेक विद्वान् लोकांस दाखविलें असतां त्यांच्या पसंतीस पडलें व तें लवकर छापून प्रसिद्ध करावें अशी त्यांनीं मला सूचना केली. तेव्हां त्यांच्या सूचनेस मान देऊन मी सांप्रत हें लोकांपुढें मांडलें आहे. तर या माझ्या अल्प सेवेवरून विबुधजन आपलें मन रंजन करून घेतील अशी आशा आहे.

पुस्तककर्ता



# या नाटकांतील पात्रें.

सूत्रधार..............................नाटककर्ता.

नटी..............................त्याची स्त्री.

कुबेर..............................यक्षांचा राजा.

देवी..............................त्याची स्त्री.

नलकूबर..............................कुबेराचा पुत्र.

मनोरमा..............................त्याची स्त्री.

सुलोचना..............................तिची दासी.

इंद्रसेन..............................कुबेराचा प्रधान.

इंदुमती..............................त्याची स्त्री.

चूडामणी..............................त्याचा पुत्र(नायक)

वासंती..............................वनदेवता.

मनमोहिनी..................तिची कन्या ( नायिका )

सेवक..............................कुबेराचा.

मालिनी..............................मनमोहिनीची दासी.
चित्रांगद...........................विदर्भनगरीचा राजा.
सुशीला..............................त्याची पहिली स्त्री.
त्राटिका............................त्याची दुसरी स्त्री.
भयानक..............................त्राटिकेचा भाऊ.
सुमती...............................राजाचा प्रधान.
सेवक................................राजाचा.

स्थळें—अलकावती व मृत्युलोकांतील विदर्भ नगरी आणि [illegible]

# संगीत मेघदूत नाटक.

## अंक पहिला.

नान्दी--पद. चाल. सांबसुराभरणा.

नमितों गजवदना ॥ कार्यारंभीं तव चरणां ॥ अज्ञानतमा हरुनी देई ज्ञानरवीच्या मज सुदर्शना ॥ धृ ॥ कालिदास कविची ॥ सुकृती मेघदूत तीची ॥ बनबिलि संगितनाटक रचना प्रिय होवो ती सकलां सुजनां

पद चाल. गुरुदत्त निरंजन.

देवो सुख तें तुह्मांला ॥ हिमनगजाधव शिव भोला ॥ धृ ॥ पृथ्वीचा रथ लावुनिया त्या चंद्र-सूर्यचक्रातें ॥ चतुर्वेद हय जोडुनि सारथि करुनी परमेष्ठीतें ॥ हेमाद्री धनु घेउनि त्यावरि

मारुनि जो त्रिपुराते ॥ १ ॥

( पारिपार्श्वक जातात; सूत्रधार पुढें येतो )

सूत्रधार—

### साकी.

नवजलदासम निज कांतीवर चपलेसम वन-माला ॥ धारण करुनी प्रमुदित करि जो श्रीलोचन मयुराला ॥ श्रीहरि तो आतां ॥ होवो तुमचें प्रियकर्ता ॥ १ ॥

परमेश्वराचें स्तवन किती केलें तरी तें थोडेंच आहे. असो. आतां चक्रवर्तिनी राजराजेश्वरीच्या जन्मदिनमहोत्सवाप्रीत्यर्थ राजाधिराज शिवाजीमहाराज होळकरसरकार यांच्या निमंत्रणावरून येथें जमलेल्या या नवनाटकदर्शनलोलुप रसिक सभाजनानां हात जोडून मी इतकीच विनंति करीत आहे कीं—

### साकी.

कालिदासकृत मेघदूत अति रम्य कथानक जें तें॥ संगितनाटकरूपें सांप्रत दाखवितों तुह्मांते ॥ यांतिल दोषांते ॥ टाकुनि घ्या गुणलेशांते ॥ १ ॥

मा लौकर येण्याला सांगितलें असतां ती अद्यापि कां येत नाहीं ? ( पडद्याकडे पाहून ) प्रिये, अजून तुझा नटीवेष पूर्ण झाला नाहीं काय ? आतां सभाजनानां किती वेळ तिष्ठत बसवावयाचें ?

( तदनंतर नटी प्र. क. )

**नटी**—प्राणनाथ ?

श्लोक-आनंदी.

**लागला मला वेळ यावया ॥ कोप तरि मनीं धरूं नका प्रिया ॥ आज कोणती या सभाजनां ॥ दावितां नवी नाट्यकल्पना ॥ १ ॥**

**सूत्रधार**—प्रिये, आज या सभाजनांना मी संगीतमच्छकटिकाचा प्रयोग करून दाखविणार आहे तर तूं सर्व पात्रांची तयारी ठेव.

**नटी**—मी आपल्या आज्ञे प्रमाणें करिते.

**सूत्रधार**—बरं पण प्रिये, तुला इकडे येण्यास उशीर लागला ?

**नटी**—आपण रागावणार नाहीं तर सांगतें कां लागला तो ?

**सूत्रधार**—मला तुझा कधींतरी राग आला आहे का? सांग बरें.

**नटी**—ऐकावें. आपण आज मला जो हा शेला पांघरण्याकरितां दिला यावर कारागिरानें मोठ्या कौशल्यानें चैत्ररथवनाचा देखावा काढिला आहे, व त्यांत लतामंडपांत गंधर्व अप्सरांसह क्रीडा करिता आहेत असें दाखविलें आहे. ( शेला दाखविते ) हें पाहून—

**पद. चाल. सुखवि नयन किति किंवा स्फटिकांचे हे**

**अति तापद या निदाघकालीं ॥ धवलचंद्रिका निशा शोभली ॥ ध्रु. ॥ अपुणांसह मी लतामंडपीं वैसुनि तैसी सुखकर केली ॥ १ ॥ करिन कधीं ती एकाएकी इच्छा दृढमन्मानें उद्भवली ॥ २ ॥ त्यायोगानें अठवण इकडे येण्याची मज नच राहियली ॥ ३ ॥**

**सूत्रधार**—वः मग याला आमच्याकडून हरकत नाहीं. पण चलायचें कोठें? चैत्ररथवनांत का नंदनवनांत?

**नटी**—आपण रागाऊं नये अशी मी पूर्वींच विनंति केली आहे.

**सूत्रधार**—प्रिये, हें मी रागानें झटलें असें का तुला वाटलें?

**नटी**—रागानें नाहींतर काय ? चैत्ररथवन व नंदनवन हीं पृथ्वीवर कां आहेत ? जसं कांहीं मला ठाऊकच नाहीं.

**सूत्रधार**—अग पृथ्वीवर नसलीं ह्मणून तीं आह्मांला येथें आणितां येत नाहींत कां ? आह्मी नाटककार ह्मणजे प्रतिविश्व-कर्म आहों. पहा आतां तुला चैत्ररथवन येथें दाखवितों.

( चैत्ररथवनाचा देखावा दाखवितो )

**नटी**—( पाहून आश्चर्यानें ) अगबाई ! प्राणनाथ हा काय चमत्कार—

पद. चाल. नंदनवन देवीनें किंवा सुखोपभोगा.

**एकाएकीं रंगस्थल तें होउनि नाहींसें ॥ परम मनोहर उपवन येथें आलें हें कैसें॥१॥ फलपुष्पांनीं शोभिवंत तरु यामाधिं बहु असती ॥ मंदमंदसा मारुत लागुनि वाटे सुख चित्तीं ॥२॥ सुखोपभो-गास्तव नानाविध मंडप वेलींचे ॥ सरोवरें तीश निर्मियलीं किति वर्णन करूं याचें ॥ ३ ॥**

**सूत्रधार**—प्रिये, पाहिलंस कां ? हेंच चैत्ररथवन. आतां अगोदर कुठें चलायचं ? सरोवरावर कां लतामंडपांत ?

**नटी**—आज माझ्या अंगाची फार तलखी होत आहे. याकरितां सरोवरावर जाऊन घटकाभर जलक्रीडा करूं.

**सूत्रधार**—ठीक आहे चला. ( चालूं लागतात )

( पडद्यांत ) ' प्रियपुत्रा, नलकूबरा, कोठें आहेसरे ?

**नटी**—( ऐकून ) प्राणनाथ, हा येथें शोकस्वर कोणाचा बरें ऐकूं येतो.

**सूत्रधार**—( पाहून ) शिवशिव प्रिये, आपण व्यर्थ या चैत्ररथवनांत आलों. सांप्रत हे सुखोपभोगास मुळींच योग्य नाहीं. पहा—

## दिंडी.

**पुत्रविरहें हा यक्षराज झाला ॥ फार दुःखित या उपवनांत बसला ॥ तया रुचती नच्च विषय-सुखविलास ॥ योग्य जाणें येथुनी आपणांस ॥ १ ॥**

( असें ह्मणून दोघे जातात )

ही प्रस्तावना झाली.

---

## प्रवेश १ ला. स्थळ—चैत्ररथवन.

( तदनंतर पुत्रविरहानें दुःखित झालेला असा यक्षराजा कुबेर स्त्रीसह आसनस्थ प्र. क. )

**कुबेर**— प्रियपुत्रा, नलकूबरा, कोठें आहेसरे !—

पद. चाल. देवस्त्री मेनका अप्सरा.

लोटुनि दुःसह विरहाग्नीमधिं जननीजनकासी ॥
कवण्या ठायीं जाउनि तनया सांप्रत तूं वससी ॥
विसरुनि इकडिल अठवण सारी कैसा गेलासी ॥
बारा वर्षें झाली तरिही नच परतुनि येसी ॥ चं-
द्रा वाचुनि शोभा नाहीं जैसी गगनासी ॥ तूं न-
सतांना स्थिति आली तशि या अलकाव-
तिसी ॥ १ ॥

**देवी**—बाळा नलकूबरा, भगवान् श्रीशंकराच्या दर्श-नास जाणें झालें तरी देखील तं मला कधीं विचारल्याखेरीज गेला नाहींस इतका तूं आपल्या मातेचा आज्ञाधारक असतां त्याच वेळीं कसा कोणीकडे परस्पर चालतां झालांस? बाळा, आतां तुझें हें विरह दुःख मी कोठपर्यंत तरी सहन करावेंरे?

**कुबेर**—बाळा नलकूबरा, तूं एकाएकी नाहींसा झालांस यामुळें आमची स्थिति पहा कशी झाली आहे ती—

पद. चाल. गंगानदि ती किंवा धीर न धरवे —

या यक्षांच्या अधिकाराचा भारचि वाटे झाला ॥
भोजनिं शयनीं सुख केचें तें नच ठावें आह्मांला ॥
अहोरात्र तव काळजि अमुच्या लागलि ती चि-

**त्याला ॥ शिवपूजानेंही शांती दुर्लभ झाली आहे त्याला ॥ १ ॥**

**देवी**--बाळा, माझी नाहीं तर नाहीं; पण तुला प्राणापेक्षांही अधिक मानणाऱ्या आपल्या स्त्रीची देखील कांहीं दया आली नाहीं कां रे. अगोदरच आईबाप नाहींसे झाल्यामुळें तिच्या मनाला अतोनात दुःख झालें होतें. तशांत हा तुझा फार दिवसांचा वियोग तिला कसा सहन करतां येईल ?

**कुबेर**--बाळ, नलकूबरा, इतके दिवस झाले तरी तूं येत नाहींस तेव्हां तुझी गति तरी काय झाली समजावी ? मला तर खचित असें वाटतें कीं--

पद. चाल. ब्राह्मण कन्या—

**स्वर्गांतील वा पातालांतिल कुणि सुंदर कामिनी गेली तुजवरती मोहुनी ॥ एकाकी तुज पाहुनि जाई निज मंदिरिं घेउनी ॥ टाकी अनुरागें बांधुनी ॥ एकांतीं रतिविलास तिजशीं करितां तुजलागुनि ॥ इकडिल अठवण ये नच मनीं ॥ १ ॥**

**देवी**—अगबाई, प्राणनाथ, हें काय आपण बोलतां ? माझी खात्री आहे कीं माझा नलकूबर मनोरमेशिवाय दुसऱ्या कोण-

त्याही स्त्रीच्या प्रेमपाशांत कधीं सांपडावयाचा नाहीं.

**कुबेर**—प्रिये, मग असें तर झालें नाहींना—

## साकी.

**खर तप आचरि ऐशा मुनिचा अपराध तया- कडुनी ॥ घडुनी त्याच्या शापें त्यातें अधोगती येवोनी ॥ मानव दानव कीं ॥ होउनि भटके भूलोकीं ॥ १ ॥**

**देवी**—हाय हाय! हे आपले शब्द ऐकून माझ्या अंगाचा थरकांप होऊं लागला! बाळा नळकूबरा, कोठें आहेसरें! या तुझ्या मातेला एकवार भेट किरे! (असें ह्मणून मूर्च्छीत होते)

**कुबेर**—प्रिये, सावधहो, तूं विचारवती असून असें काय करतेंस? पहा—

## दिंडी.

**सुखद मोठेपण हें न मुळीं होतें ॥ अमित दुःखें तीं यांत असति कांते ॥ शोक आवरुनी धैर्य दे म- नाते ॥ कधीं तरी तो भेटेल आपणांते ॥ १ ॥**

**देवी**—(सावध होऊन) प्राणनाथ, आजपर्यंत मी मनाला पुष्कळ धीर दिला पण आतां कांहीं हें दुःख माझ्यानें सहन करवत नाहीं या साठीं माझा बाळ आणून मला भेटवा.

**कुबेर**—प्रिये, अमात्यपुत्र चूडामणी हा आपल्या मातापितरांचा व त्याचा शोध करण्या कारितां गेला आहे तो कायवर्तमान आणतो हें समजेपर्यंत कसेंतरी मनाचें समाधन कर. मला वाटतें तो खचित त्याचा शोध लावील.

**देवी**—देव करो आणखी तो माझ्या बाळाचा शोध लौकर घेऊन येवो. मला आतां कांहीं मनाचें समाधान कारितां येत नाहीं.

( दोघें दुःखानें स्तब्ध बसतात. नंतर चूडामणी प्र. क. )

**चूडामणी**—

**पद**. चाल. हा दुष्टापंचशरा—

**मम जननीजनकांनीं सोडिले मला ॥ मित्र तसा टाकुनिया जाय एकला ॥धृ०॥ तत्शोधास्तव मी जरि ॥ सकल लोक फिरलो परि ॥ कोणाचा आजवरी ॥ नच ठिकाण लागे तरि ॥ काय करूं न कळें निरुपाय जाहला ॥ १ ॥**

आतां महाराज यक्षाधिपति यांस मी काय वर्तमान सांगू? व भगिनीला हें कृष्णवदन कसें दाखवूं? अथवा दैवीं आलें तें पत्करलें पाहिजे. महाराजांची स्वारी देवीसह चैत्ररथोद्यानांत बसली आहे असें द्वारपालानें सांगितलें तर तिकडेच जावें. [ तसें करून समोर पाहून ] अहाहा! हे आमचे यक्षराज! यांची काय दशा झाली ही—

## साकी.

**कांती पाहिली पालटुनीया पांडुर तनु झाली ती ॥**
**प्रभातकालीं तेजहीनता येई जशि शशिवरती ॥**
**पुत्रप्रेमाची ॥ कमाल दिसते ही साची ॥ १ ॥**

( जवळ जाऊन ) देवाधिदेवांचा विजय असो.

**कुबेर**—कोण अमात्य पुत्र चुडामणि ! वत्सा, बैस खालीं.

**चूडामणी** ( तसें करितो )

**देवी**—बाळा, तुझ्या मातापितरांचा व माझ्या बाळाचा तुला कांहीं शोध लागला कांरे ?

**चूडामणी**—यक्षराज, देवी, आपणांस परत निराशेचें वर्तमान सांगण्याकरितां परमेश्वरानें मला जिवंत तरी कशाला ठेविलें? जसा मी गेलों तसाच परत आलों; मला कोणाचाही शोध लागला नाहीं.

**देवी**--काय ह्मणतोस ? तुला कोणी देखील भेटलं नाहीं तर मग माझा बाळ भेटण्याची माझी सर्व आशा निष्फळ झाली नां ? हायरे बाळा, नलकूबरा ! (मूर्च्छित पडते )—

**कुबेर**—प्रिये, सावध हो सावध हो. ( ती सावध होते ) वत्सा, सर्व ठिकाणीं शोध केलांस कांरे:—

**चूडामणी**—यक्षराज फार काय सांगू ?

पद. चाल. रतिखेद जरी किंवा स्वमनीं वा नयनीं.

चवदाही भुवनामाधें मी त्यांना शोधियलें ॥ घोर महारण्य तसें एकनही सोडियलें ॥ शिवमाधवदेवालयिं जरि जाउनि पाहियलें ॥ तीर्थांतुनि कोणाचें वर्तमान नच कळलें ॥ १ ॥

राजा—मग मात्र आमची निराशा झाली ! अरे, दुर्दैवा—

पद. चाल. अर्धांगी कृत.

दुःखद गति तूं भार्येसह जी केलिस सचिवाची ॥ प्राणाहुनिहि प्रिय ऐशा त्या अनुच्या पुत्राची ॥ १ ॥ नीच गती दे लौकरि आतां आम्हां दुर्दैवा ॥ त्यांच्या संगति वांचुनि कैसा कालचि कंठावा ॥ १ ॥

चूडामणी—( स्वगत ) देवाधिदेवांनींदेखील अगदीं धैर्य सोडिलें. आतां यांचें समाधान कसें करावें ?

देवी—प्राणनाथ, खरोखरच कांहो आतां माझा बाळ मला फिरून भेटावयाचा नाहीं—

कुबेर—प्रिये, आतां हें दुःख अपरिहार्य आहे यासाठीं ज्याचें त्यानेंच आपलें समाधान केलें पाहिजे. तूं मला विचारतेस पण मी कोणाला बरें विचारावें ? असो. आतां आपण या मायापाशांतूनच मोकळें होऊं—

## पद. चाल दैवयोग दुर्विपाक.

**यक्षाधिप चूडामणि हा करोनिगे ॥ सर्व राज्य देऊं हें तत्करांत गे ॥ जरि लहान हा अपुणां ये दिसोनिगे ॥ तरि आहे चतुर शूर धैर्यवान गे ॥ इकडील काळजि सारी मग त्यजोनि गे ॥ सार्थक करुं देहाचें तप करोनि गे ॥ १ ॥**

**देवी**—चलातर. मला क्षणभर देखील या अलकावतींत राहणें नको असें झालें आहे.

**चूडामणी**—आपणा उभयतांच्या चरणापाशीं माझी इतकीच विनंति आहे कीं आपण इतक्यांतच निराश होऊन असें भलतेंच करूं नये.

**कुबेर**—तर मग आणखी कांहीं अप्रिय घडल्यावर आह्मी जावें हेंच तुझें ह्मणणें कीं नाहीं ?

**चूडामणी**—महाराजांनीं धैर्य सोडिलें नाहीं तर अद्यापिही आशेला जागा आहे. पहा; मी स्वर्गांतील व पातालांतील सर्व लोक शोधिले, परंतु आपली आज्ञा नसल्यामुळें मध्यमलोकीं मुळींच गेलों नाहीं. तर तेथें जाऊन मला शोध करण्याविषयीं आज्ञा व्हावी व तोंपर्यंत उभयतांनीं असेंच धैर्य धरावें.

**देवी**—अरे, त्या पापीलोकांत तो कशाला जाईल हा तुला उगीच भ्रम आहे.

**चूडामणी**—असें म्हणूं नका. जरी तो लोक अधर्म व दुःख यांचें वसतिस्थान आहे तरी देखील आम्हां यक्षांचें मन आकर्षण करतील अशीं तेथें पुष्कळ स्थानें आहेत—

## श्लोक.

**भूलोकीं गिरिराजतुंगशिखरें नानापरी शोभती ॥ या मंदाकिनिहूनि थोरचि अशा तेथें नद्या वाहती ॥ मोठींमोठिं सरोवरें तशिं वनें संतोषवीती अती॥ ज्यांना अंत न ते समुद्र बघतां ही गुंगहोते मती ॥ १ ॥**

फार काय सांगूं ? साक्षात् परमात्मा देखील तेथें अवतार घेऊन कांहीं काल वास करितो.

**कुबेर**—प्रिये, हा म्हणतो तें खरें आहे. प्रधानजी तर नेहमीं तेथचे चमत्कार पाहून ते मला सांगत असत. यासाठीं हा जाऊन येईपर्यंत आणखी कांहीं दिवस असेंच काढूं ?

**देवी**—आपल्या आज्ञेबाहेर मी नाहीं.

**चूडामणी**—आतां मला मध्यमलोकीं जाण्याची आज्ञा व्हावी. मनोरमेला भेटून लागलीच विमानांत बसून मी जातो.

**देवी**—बाळा, जा लौकर, तुझ्या हातून तरी तिचें कांहीं समधान झालें तर पहा.

**चूडामणी**—( मनांत ) आतां मी तरी तिचें समाधान कसें करणार ?

**कुबेर**—वत्सा, मध्यमलोक वाईट आहे यासाठीं तेथें फार दिवस न राहतां लौकरच परत ये.

**चूडामणी**—मी आपल्या आज्ञेबाहेर वागणार नाहीं. ( जातो )

**कूबेर**—प्रिये, हा पाहिलास कां प्रातःकाळ झाला—

## साकी.

**अस्ता जाउनि रजनिपति तो पसरित निज कि-**
**रणाला ॥ सकल जगाचा दीपक बघ हा दिनमणि**
**उदया आला ॥ जाऊं तरि कांते ॥ शिवदर्शन तें**
**घेण्याते ॥ १ ॥**

( सर्व जातात. )

---

## प्रवेश २ रा. मनोरमेचा महाल.

( मनोरमा दुःखित बसली आहे व जवळ दासी आहे )

**मनोरमा**—हाय हाय ! देवा काय ही मजवर आग पाखडलीस ?

पद. चाल. अति कठिण हृदय

काय भयंकर पातक तें मजकडुनी घडलें होतें ॥
भोगाया दुःखचि ह्मणुनी घातलेंस मज जन्माते ॥
मायबाप एकाएकीं सोडुनिया गेले माते ॥ चाल ॥
प्राणनाथही नाहींसा ॥ जाहला तसा ॥ तद्विर-
हाते ॥ सोसणें कठिण झालें तें ॥ १ ॥

दासी--( मनांत ) बाईसाहेबांच्या दुःखसागराला पुनः शोकाचा पाट फुटला आतां करावं तरी काय ? ( उघड ) बाईसाहेब, आतां हा शोक आणखी किती करावयाचा ? आज बारा वर्षे झालीं तरी आपल्या डोळ्यांचे पाणी कसें तें खळत नाहीं. अशानें पुढें वाट काय लागणार ?

मनोरमा--सुलोचने, तूं तरी बरीच आहेसग. अग माझ्या आईबापांनीं व प्राणनाथांनीं जे मजवर उपकार केले आहेत त्याबद्दल त्यांचा वियोग झाला असतां माझें हृदय वारंवार भडभडून आल्यावांचून कसें राहील ? छे, हें तुझें ह्मणणें मला अगदीं पसंत नाहीं. बाबा,मजसाठीं तुह्मांला किति तरी श्रम पडले ?

पद. चाल. मर्यादा सोडुनि.

बहु लालन पालन माझें बालपणापासुनि केलें ॥
मागितलें जें देउनि तें मजला बहु संतोषविलें ॥
अर्पुनिया गुणवान् पतिला थोरपणाला चढवीलें ॥

॥ चाल ॥ उपकार असे किति तुमचे ॥ या कन्ये-
वरती साचे ॥ असती वदवेना वाचें ॥ जाति-
लही कधिं नच फिटले ॥चाल॥ या वियोगदुःखीं
दुहिता ॥ लोटुनि कां दिलि मग ताता ॥ १ ॥

अगे, माझे, आवडते आई, घटकाभर देखील तुला मज वांचून चैन पडत नव्हतें इतकी तुझी मजवर माया असतां आतांच निष्ठुर कशी झालीस?

## अंजनीगीत.

बाळपणीं तुज नानापरिचा ॥ त्रास दिला मी
होता साचा ॥ ह्मणुनी मजवरि धरिसी त्याचा ॥
रागाचि कां माते ॥ १ ॥

हायहाय ! हे आईबापांचे वियोगदुःख असह्य तर खरेंच; पण तें देखील सर्व ज्यांच्याकडे पाहून मी गिळून टाकलें होतें त्या माझ्या प्रियास देखील दुर्दैवा, तूं कसारे कोणीकडे घेऊन गेलांस ? आतां मला समाधान मानण्याला कोणती जागा राहिली आहे ? हे प्राणप्रिया, नलकूबरा--

पद. चाल माझ्या मनिंचे

प्राणाहुनिही तव मनिं होती जीविषयीं प्रीती ॥

अप्रिय झाली एकाएकीं तुज भार्या काशि ती ॥ धृ०
भोजनशयना नच त्वां केलें कधिं मज वांचोनी ॥ दिन घालविले नानापरिचे रतिविलास करुनी ॥ त्वन्मुख शशि ही बघुनी झाली विकसित कमलीनी ॥ पाहूं कोठें तुज आतां मी करुं तरि-काय गती ॥ १ ॥

**दासी**—बाईसाहेब, आतां मी तुह्मांला हात जोडते; तुमचे भाऊ चूडामणी त्यांचा शोध करावयाला गेले आहेत ते परत येईपर्यंत तरी धीर धरा.

**मनोरमा**—अग मी आपणाकडून पुष्कळ यत्न करिते पण हा शोक मजकडून आवरला जात नाहीं याला माझा काय उपाय?

**दासी**—बाईसाहेब, आपण सारख्या महालांतच बसून आहां ह्मणून तुमचें मन वारंवार असें गहिंवरून येतें, तर घटकाभर उपवनांत चला ह्मणजे तेथली शोभा पाहून जरा मनाला करमणूक होऊन दुःखाचा विसर पडेल.

**मनोरमा**—सुलोचने, हा केवळ तुला भ्रम आहे, मी उपवनांत आले तर किंचित्‌ही समाधान न होतां उलट शोक मात्र वाढेल. पहा—

पद्. चाल बाई तूं या आम्रतरूसी

ज्या ज्या ठायीं मी प्राणपती ॥ मिळुनी केले विलास असती ॥ तीं स्थानें जरि पाहिन नयनीं ॥ होइल मोठें मज दुःख मनीं ॥१॥ सुगंध मारुत तो लागोनी ॥ तशि पक्ष्यांची क्रीडा बघुनी ॥ या शोकाला कड येवोनी ॥ जाइल वाटे तनु फाटोनी ॥ २ ॥

**दासी**—बाईसाहेब, आपणांस असें होईल असें वाटत असेल तर तेथें नका चलूं; पण कांहींतरी करून हें दुःख विसरा. युवराज नाहींसे झाल्यानें सर्वांनाच सारखें दुःख झालें आहे हा त्यांचा आवडता राघु पहा; त्यानें देखिल उदासपणा धरून खाण्यापिण्याचा त्याग केला आहे.

**मनोरमा**—अरे शुका, प्राणनाथांचा तुजवर मोठा लोभ होता, तेव्हां ते कोठें गेले हें तुला त्यांनीं सांगितलें असेल. मग सांगतोस कां मला ? पहा सांगशील तर—

## अंजनीगीत.

देईल सुख जी बहु तव चित्ता ॥ मिळविन मैना आशी तुजकरितां ॥ तरि सांगे मज ठिकाण आतां ॥ लौकरि नाथांचा ॥ १ ॥

अरे शुका, तूं किती तरी लबाड आहेस रे ? इतकं विनवणी करितें तरी मला सांगत नाहींसना ?

**दासी**—बाईसाहेब, हें काय असें करतां ? त्य ज्ञान आहे ह्मणून तो सांगणार ?

**मनोरमा**—खरंच मला दुःखाच्या भरांत काय याचें भानच राहिलें नाहीं. जा याला नेऊन ठेव आतां काय करूं ?

**पद. चाल. जाई परतोनी**

**जड झाले बाई ॥ मजला ॥ प्राण सर्व हे पाही ॥ ध्रु ॥ मायबाप ते सोडुनि जातां ॥ पतीनें तैसें त्यजितां ॥ समाधान मग व आतां ॥ ममचित्ता वद तें होई ॥ १ ॥**

( असें ह्मणून मुर्च्छेंत पडते )

**दासी**—बाईसाहेब सावध व्हा ! अग बाई यांना त मुर्च्छा आली; आतां कसं करूं ? ( पाहून ) ते कोण व आहे ? हे बाईसाहेबांचे भाऊ चूडामणी. बरे वेळेवर यांनीं कांहीं तरी आनंदकारक वर्तमान आणिलें असेल.

( तदनंतर चूडामणी प्र. क. )

**चूडामणी**—भगीनीचें समाधान करावयाला आलों

कसें करावें हें कळत नाहीं. मी तिला आतां जर खरें वर्तमान सांगितलें तर तिचा शोक मुळींच कमी होणार नाहीं. या-करितां तिला कांहीं आशा वाटेल असेंच सांगावें.

**दासी**—बाईसाहेब, उठा उठा.

**चूडामणी**—कायग, ताईला झोंप लागली आहे कां?

**दासी**—झोंप कसली? इतका वेळ दुःख करून करून त्या मूर्च्छांत झाल्या आहेत. ( मनोरमेस ) बाईसाहेब—

**मनोरमा**—( सावध होऊन ) सुलोचने, कशाला मला सावध केलेंस? मूर्छित पडल्यामुळें त्यांचें दुःख अंमळ विसरलें होतें तें मात्र पुनः होऊं लागलें.

**दासी**—बाईसाहेब, आपल्याला भेटण्या करितां हे पहा आपले भाऊ आले आहेत.

**मनोरमा**—कोण दादा कां? दादा बैस कीरे खालीं. तुला कांहीं कोणाचा शोध लागला कां?

**चूडामणी**—ताई, इतकी उतावळी होऊं नकोस. धैर्य धरून आणखी कांहीं दिवस आपणांस त्यांचें वियोगदुःख सहन केलें पाहिजे. जरी मला कोणी भेटलें नाहीं तरी त्यांचा शोध लागला आहे.

**मनोरमा**—काय ह्मणतोस ? त्यांचा तुला शोध लागला आहे. मग त्यांना तूं बरोबर आणल्यावांचून कसा परत आलास ?

**चुडामणी**—ते सर्व मृत्युलोकीं आहेत असें मला खात्री-पूर्वक समजलें आहे. पण तेथें जाण्याला महाराजांची आज्ञा नव्हती. आतां नुकतांच त्यांना भेटून व त्यांची आज्ञा घेऊन तिकडे जाण्यास निघालों आहें तर —

## दिंडी.

**पुढिल सौख्यावरि लक्ष देउनी तें॥ दुःख आव-रि जें फार तापवीतें ॥ तातजननी तव कांतही तसा तो ॥ लौकरी तुज आणुनी भेटवीतों ॥ १ ॥**

**मनोरमा**—दादा, तुह्मीं सारे उपदेश करता पण हें दुःख कांहीं मला आवरलें जात नाहीं. असो. मामंजींची तुला आज्ञा झाली आहे तर तूं मृत्युलोकीं जा, व त्यांना लौकर घेऊन ये. माझ्या मनाला समाधान ह्मणशील तर होणें दुर्घट आहे. कारण—

**पद.** चाल. व्यर्थ मी जन्मलें

**विषसम गेली तत्प्रीती॥ पसरुनिया मम शरिरीं ती ॥ ध्रु ॥ आग तिजमुळें सर्वांगाची निशिदिनिं बघ**

होती ॥ १ ॥ भेटी त्यांची झाल्यावांचुनि नमिळे
काधिं शांती ॥ २ ॥

**दासी**—बाईसाहेब, आतां आपण हा शोक कांहीं आवराल तर बरी गत आहे. मला करायचा किती? आज बारा वर्षें झालीं. इतके दिवस असा आकांत जर परमेश्वरापुढें केला असतां तर तो देखील पावता.

**मनोरमा**—सुलोचने, तू ह्मणतेस तेंच खरं. मी इतका आकांत केला तरी कोणाला माझी दया येतां आहे कां? असो. आज तूंच मला गुरु झालीस—

पद. चाल. भूपती खरेंत हीं.

मी आजपासुनी दुःख सर्व सोडियलें ॥ पद
गिरिजापतिचे स्वमनीं वद्य दृढ धरिलें ॥ नच
आतां क्षणभर राहतसें मी येथें ॥देवालयीं जाउनि
निश्चित व्रत आचरितें॥ चाल॥ सहायकर्ता नलगे
कुणि यावरी ॥ सर्व भार मम त्या गौरीपतिवरी ॥
॥ चाल ॥ मायबापपति ते बघेन जेव्हां आले ॥
गृहिं त्या दिनिं येईन नच तरि मुळीं अंतरलें ॥१॥

**चूडामणी**—ताई, असें काय हें भलतेंच करतेस ! मोठ-

मोठ्या ऋषींनां देखिल जें दुर्घट तें व्रत तुझ्यासारख्या अज्ञान स्त्रीच्या हातून कसें होणार ?

**दासी**—बाईसाहेब, माझ्या तोंडांतून सहज चुकून शब्द गेला याची माफी मागतें. आपण लागलीच असें कराल असें मला नाहीं वाटलें.

**मनोरमा**—अग तूं माझ्या कल्याणाचें सुचविलेंस यांत वाईट काय केलेंस. दादा, तूं आतां महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मृत्युलोकीं जा. या तपांत मला सिद्धि येवो वा न येवो; पण—

## साकी.

**निश्चय फिरविन नच हा कोणिही केले जरि उपदेशा ॥ पविपातींही प्रसन्न झाल्याविण नच सोडिन ईशा ॥ १ ॥**

**दासी**—बाई साहेब, मीही आपण बरोबरच येते.

**मनोरमा**—तुला वाटेल तर चल. ( दोघी जातात )

**चूडामणी**—ताईचा स्वभाव फार हट्टी आहे तेव्हां आपण कितीं जरी आग्रह केला तरी व्यर्थच होणार. असो. यांत समाधान इतकेंच मानायाचें कीं शिवपूजनामुळें किंचित् तिचें

दुःख कमी होईल. आतां आपण मृत्यु लोकीं जावें. हे जगदीश्वरा—

साकी.

सुतपें तीच्या कीं मद्यत्नें द्या तुला येवोनी ॥ भेटिव माझा मित्र तसा तो तात तशी ती जननी ॥ सीमा नच आतां ॥ राहिलि दुःखा भगवंता ॥ १ ॥

( सर्व जातात. )

---

प्रवेश ३ रा. आकाशमार्ग.

( तदनंतर विमानस्थ चूडामणी प्र. क. )

**चूडामणी**—महाराज यक्षराज यांची आज्ञा मागून व भगिनींचा निरोप घेऊन मी मातापितरांचा व मित्राचा शोध करण्याकरितां मृत्युलोकीं तर जाव्यास निघालों; पण आतां अगोदर जावें कोठें ? अथवा प्रथम जें नगर दृष्टीस पडेल तेथेंच जावें. अहाहा ! या प्रातःकालची शोभा किती रमणीय दिसत आहे—

## पद.

विचित्र नानापरि रंगांनीं गेलें नभ हें शोभुनियां ॥ नक्षत्रांचें तेज लोपवुनि बालरवी तो ये उदया ॥ पारिजाततरु कुसुम सुगंधित मंद मंद हा ये वारा ॥ त्यायोगें मन विकसित झालें लोपुनि गेला श्रम सारा ॥ १ ॥

तसेंच हें विमान अत्यंत वेगवान् असल्यामुळें खालीं भूलोकचा काय चमत्कार दिसतो आहे पहा----

## दिंडी.

मोठमोठीं गिरिशिरें वनें तसीं ॥ येति वरती वाटतें असें मजसी ॥ शांत बसुनी या यानमंदिरांत ॥ मौज त्यांची मी असें कीं पहात ॥ १ ॥

अरे, मी बोलतां बोलतां या लोकांत आलों. असो. आतां हा पर्वत दिसतो आहे याच्या शिखरावर उतरावें. ( तसें करून ) अहाहा ! या पर्वत शिखरावरून हा लोक कितीतरी रम्य दिसत आहे--

## श्लोक.

मैदानें दिसती सपाट किति तत्भूमी तृणाच्छादित ॥

**आनंदें पशु भिन्नभिन्न वरतीं आहेत ते खेळत ॥**
**तैसे हे उदकप्रवाह इथुनी खालीं कसे वाहती ॥**
**ही शोभा अलकावतीहुनि मला रम्या खरी वाटती॥२**

एकूण परमेश्वरानें सृष्टिसौंदर्य प्रत्येक लोकांत सारखेंच ठेवलें आहे यांत संशय नाहीं. बरें पण हा पर्वत कोणता ? जवळ पास कोणी नाहीं; नाहीं तर त्यास विचारलें असतें. ( दचकून ) अरे या प्रकाशांत ही भयंकर छाया कोणाची बरें दिसते? ( पाहून )हा कोणी राक्षस इकडे येत आहे तर आपण या वृक्षाआड उभे राहावें.

( तदनंतर भयानक राक्षस प्र. क. )

**राक्षस**—माझा पिता महामाय यानें आपल्या सर्व राक्षसी-माया मला शिकविल्यावर मी अमरत्व मिळावें ह्मणून ब्रह्मदेवा-पाशीं तपश्चर्या केली असतां त्यानें प्रसन्न होऊन हा बाण मला दिला आणि सांगितलें कीं, या बाणाशिवाय तूं दुसऱ्या कशानेंही मरणार नाहींस. हें वर्तमान माझ्या पित्यानें ऐकून त्यानें मला आज्ञा केली कीं, हा बाण तुझ्या हातांत असला तरी प्रसंगीं घातक होईल तर हा कोठें तरी पर्वत शिखरावर नेऊन पुरून टाक. त्याच्या आज्ञेप्रमाणें मी या पर्वतावर आलों आतां येथें हा बाण पुरावा. ( तसें करितो )

**चूडामणी**—काय हा महामायराक्षसाचा पुत्र. याचा उद्देश इतरराक्षसाप्रमाणें अमरत्व मिळवून खचित सज्जनांस पीडा देण्याचा असेल. असो याचा मृत्यु मला ठाऊक झाला हें एक प्रकारें बरें झलें.

**राक्षस**—( बाण पुरून ) आतां आपण जावें आणि फार दिवसापासून जिनें माझें मन हरण केलें आहे ती मनमोहिनी मिळण्याविषयीं प्रयत्न करावा. अहाहा हे सुंदरी, तुझी नुसती अठवण झाली तरी मला परमानंद होतो. तुज सारखी रूपवती त्रैलोक्यांत कोणी नसेल. तशांत तुझ्या कंठांतल्या रत्नमालेनें तर तुला अधिकच शोभा आणिली आहे. सुंदरी, तूं चित्रांगद राजाचे पोटीं येऊन त्या राजास व विदर्भनगरीस जगांत धन्य केलेंस. या तुझ्या सौंदर्याचा भोक्ता ब्रह्मदेवानें कोण बरें निर्माण केला आहे ? अथवा दुसरा कोण ? हाच भयानक राक्षस . मी तिला दुसऱ्याला कधीं देऊं देणार नाहीं. आतां अनोदर भगीनीला भेटून तिला माझी इच्छा कळवून तिच्या सांगण्यानें त्या राजानें आपणहून ती मला दिली तर पहातों. नाहींतर बलात्कारानें तिचें हरण करतों. मजपासून मग तिला कोण सोडवणार ? असो आतां जाऊन भगिनीला भेटावें. ( जातो )

**चूडामणी**—एकूण या दुष्टाचा सर्व प्रयत्न केवळ ती सुंदरी हरण

करण्याकरितां आहे. बरं पण हा काय चमत्कार ? यानें केलेलें त्या सुंदरीचें वर्णन ऐकून तिला बघण्याविषयीं माझ्याही मनाला उत्कंठा लागून ती वाढत चालली. खरोखरच ती इतकी सुंदर असेल काय ? कांहीं असो. तिला पाहिल्याशिवाय मनाला समाधान वाटणार नाहीं ? त्या राक्षसानें तिचें नांव काय बरें घेतलें ? हं मनमोहिनी, विदर्भ नगरीच्या चित्रांगद राजाची कन्या. आपणाला मातापितरांचा व मित्राचा शोध करण्याकरितां जाणें आहे तर अगोदर तेथेंच जावें. माझा जाण्याचा तर निश्चय झालाच पण या दुष्टाचा प्राणरूप हा बाणही घेऊन जावा. कदाचित् वेळेस याचाही उपयोग होईल. ( तसें करून चालून ) अरे पण मी हें आरंभलें काय ?

## साकी.

**मित्रतातजननीच्या शोधास्तव या लोकीं आलों॥ मनमोहिनिचें वर्णन ऐकुनि तिजवरि मोहित झालों ॥ नकळे मज याचा ॥ परिणाम काय तो पुढचा ॥ १ ॥**

( असें ह्मणून जातो. )

## अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.

——:०:——

प्रवेश. १ ला स्थळ. विदर्भपुरांतील जलमंदीर.

( पलंगावर मनमोहिनी बसली आहे व जवळ दासी उभी आहे. )

**दासी**—ताईसाहेब, माझ्या मनांतून फार दिवस आपणांस कांहीं विचारावयाचें आहे. विचारूं का ?

**मनमोहिनी**— ( सचिंत ) काय बाई तुला विचारावयाचं आहे ?

**दासी**—ताईसाहेब, आपल्या अगदीं लहानपणापासून सरकारांनीं मला आपल्या सेवेला ठेवलें आहे. तेव्हां तुमच्याच संबंधानें मी कांहीं विचारलें तर न रागावतां मला खरें कायतें सांगाल कां ?

**मनमोहिनी**–( अपल्याशीं ) माझ्यासंबंधानें ही मला काय बरें विचारणार ह्मणते ? अथवा हल्लीं जी माझी कांहीं विलक्षण स्थिति झाली आहेशीं मला वाटते ती तर हिच्या लक्षांत आली नसेल नां ? ( उघड ) बरें तुला अगोदर काय विचारणें आहे तें विचार तर खरी.

**दासी**—हे पहा आतांशी आपली स्थिति मला कांहीं चमत्कारिकच झालीशी दिसते. आपण एका जागीं स्थीर बसत नाहीं; नीट लक्ष लावून बोलत नाहीं; नेहमींच्या करमणुकीच्या खेळांचा कंटाळा करितां; व अहोरात्र आपल्या मनाशींच कसलें तरी चिंतन करीत असतां हें खरें कां ?

**मनमोहिनी**—( कांहीं न बोलतां विचार करीत बसते )

**दासी**—ताईसाहेब, विचार कसला करितां ? मी ह्मणतें यांत कांहीं खोटें आहे कां सांगा.

**मनमोहिनी**—मालिनी, तूं मोठी चतुर आहेस; आज किती दिवस तूं ह्मणतेस तशी माझी स्थिति झाली असून कशांत म्हणून माझें मन रमत नाहीं. अहोरात्र अंगाची तळमळ होते. वाड्यांत मला चैन पडेना ह्मणून बाबांनीं या बागेंतील जलमंदिरांत आणून ठेविलें; पण येथें तर मला अधिकच त्रास होतो. पहा—

पद. चाल. बघुनि उपवनी

वैऱ्यासम या उपवनिंचे हे पुष्पित तरु भासती ॥
येई अंगावरि कांटा जरि तन्मारुत वाहती ॥ सरो-
वरामधिं अंग धुतांही तळमळ नच राहती ॥
शीतल सुखकर चंद्राचे कर तापविती मज अती॥
॥ चाल ॥ मी थंड उटी ती वाळ्याची लाविते ॥

**कुसुमांच्या शय्येवरि शयना सेविते ॥ चाल ॥**
**तरि मज कांहीं सुख नच वाटे भ्रमिष्ट होते मती॥**
**कारण याचें नकळे आतां होइल कैसी गती ॥१॥**

**दासी**—ताईसाहेब, असें कां आपणांस आतांशा होतें तर ? मग याचें कारण आलें माझ्या लक्षांत.

**मनमोहिनी**—काय कारण तुझ्या लक्षांत आलें ? सांग मला.

**दासी**—कांहीं नाहीं. तरुणपणांत सर्व स्त्रियांना पीडा करणारी जी मदनबाधा तीच तुह्मांला झाली आहे व आपलें मन जें कशांत लागत नाहीं हा सर्व तिचाच प्रभाव आहे.

**मनमोहिनी**—मदनबाधा तीग काय ?

**दासी**—मदनबाधा ह्मणजे एकांतीं पतीसह विलास करण्याची इच्छा उत्पन्न होणें. हल्लीं तिकडे आपलें सर्व लक्ष्य लागल्यामुळें इतर गोष्टींपासून आपणांस सुख वाटत नाहीं.

**मनमोहिनी**—चल जा. कांहींतरी बोलतेंस झालं. वेडी कुठली.

**दासी**—ताईसाहेब, मी खोटें बोलत नाहीं: लौकर ही गोष्ट महाराजांच्या कानावर जाऊंद्या ह्मणजे ते एकाद्या राजपु-

त्राशीं आपलं लग्न करून टाकतील. नाहींतर तुम्ही हें आपलें दु:ख असंच मनांत ठेवाल तर याचा परिणाम मला कांहीं नीट दिसत नाहीं.

**मनमोहिनी**—बरं आज दोन दिवस कसा तो माझा डोळा लागला नाहीं यासाठीं मी निजतें व तूंही आंत जाऊन नीज.

**दासी**—निजा. ही मी जाऊन निजतें. ( जाते )

**मनमोहिनी**—ही मालिनी मदनबाधा म्हणून म्हणते तीच खचित मला झाली आहे; पण तिचा प्रतिकार करण्याला काय करावा? मला असं होंत म्हणून कोणाजवळ सांगावयाचा [illegible] करावा? मला असं होंत म्हणून कोणाजवळ सांगावया- [illegible] हे कुसुमायुधा मदना—

**चूडामणी**—अलकावतींत वास करणारे आह्मी यक्ष मध्यमलोकीं काय आहे ह्मणून त्यास उपहास करितों परंतु या विदर्भनगरीचें ऐश्वर्य पाहून माझीतर अक्कल गुंग होऊन गेली!

पद. चाल. परम सुवासिक किंवा अंजनपर्वा नकरी.

लक्ष्मीचें जणुं विलासमंदिर विदर्भपुर हें मज दिसतें ॥ रचना कितितरि असे मनोहर याची नयना तोषवितें ॥ १ ॥ मोठ्यामोठ्या प्रासादांच्या रांगा यामधिं बहु असती ॥ ठायीं ठायीं उद्यानें तशि प्रसन्न चित्ता जीं करितीं ॥ २ ॥ निजकर्मामाधिं दक्ष [illegible]
ते या नगरीतिल जन कि[illegible]
केवळ [illegible]

कसलीही हरकत होण्याचा संभव नाहीं. ( गच्चीवर येऊन चहूंकडे पाहून ) अहाहा. येथून सभोंवतालची उपवनश्री कितीतरी मनोहर दिसत आहे—

पद. चाल. अंजनीगीतांची.

जलतुषारयुत हा कुसुमांचा ॥ मंद्वात हरि श्रम शरिराचा ॥ मंजुळ रव त्यापरि पक्षांचा ॥ स्वागत मम करितो ॥ १ ॥ वसंत मित्रासह मन्मथमुनि ॥ मनमोहिनिच्या रूपा भुलुनी ॥ जणुं तप करितो या उद्यानीं ॥ ऐसें मज वाटे ॥ २ ॥

ला मुळींच धीर होत नाहीं. ... उघडींच दिसत आहेत तर

पद चाल दवडूं नका

तव दासी करजोडुनि विनविते तुला ॥ सर्वथैव आधिन कीं करु नको मला ॥ मी अबला जाणुनि-या कुसुम कोमला ॥ पति मिळेल आवरि तों बाण-आपुला ॥ १ ॥

( असें म्हणून निजते. नंतर विमानस्थ चूडामणी प्र. क. )

मणिमय दीपांचा ॥ प्रकाश सुखकर पडला साचा ॥ ठायी ठायीं देवांच्या या तजबीरा बहु शोभा देती ॥ १ ॥

बरें पण ती सुंदरी येथे कोठें बरें असेल ? ( पुढें पाहून ) अहाहा ! माझ्या जन्माचें सार्थक झालें या पर्यंकावर एका हातावर डोकें ठेऊन निजली आहे हीच सुंदरी मनमोहिनी—

पद. चाल. जरि नाहिं कमल तें करीं.

किति सुंदर ही कामिनी ॥ कमललोचनी ॥ कुंदरदनी ॥ दिसे पूर्णचंद्राननी ॥ १ ॥ ही असे पीन पयोधरी ॥ सिंहकटि खरी ॥ पृथुनितंबिनी ॥ रंभोरू गजगामिनी ॥ २ ॥ कुंतल केशकलापिनी ॥ करकमलीनि ॥ इस निमोनी ॥ धन्य होय विधि या भुवनीं ॥ ३ ॥

आणखी हा काय चमत्कार? देवस्त्रीलाही दुर्लभ अशी रत्नमाला या सुंदरीच्या गळयांत शोभते आहे. पहा—

साकी.

रवि तेजासम तेज असें कीं तीच्या प्रति रत्नाचें ॥

**मध्यमलोकीं कोणाला हें कधिंही न मिळायाचें ॥ वाटे रवि इजला ॥ प्रेमें देई निजमाला ॥ १ ॥**

मला तर मालेनें तिला अधिक शोभविली आहे किंवा तिनें मालेला अधिक शोभविली आहे याचा निर्णयच करितां येत नाहीं. आणखी, ही सुंदरी सांप्रत निद्रिस्थ आहे हें एके प्रकारें बरें आहे कारण--

## दिंडी-

**किती जरि मी पाहिलें सुंदरीतें ॥ तरी तृप्ती या मनाची न होते ॥ असे निजलेली ह्मणुनि धैर्य येतें ॥ पूर्ण निरखुनि अवयवां पहायातें ॥ १ ॥**

परमेश्वरा, या सुंदरीची प्राप्ति ज्यास होईल तो खचित आखिल जगांत धन्य होय. पण ही धन्यता मला मिळेल काय ? ( विचार करून ) अथवा न मिळायाला काय झालें ? प्रयत्न तर करून पहावा. आतां हिला जागें करावें. पण नको. तशानें पुढील भलताच प्रसंग अगोदरच येण्याचा संभव आहे. तर आज आपण आल्याची नुसती कांहीं खूण करून जावें व उदयीक पुनः या सुंदरीच्या दर्शनास यावें. पण खूण काय

बरें करावी ? ( विचारकरून ) हं असेंच करावें. ही निद्रिस्थ आहे तर हिच्या बोटांतली अंगठी आपण काढून घ्यावी. व आपली त्यांत घालावी ( तसें करून ) काय करावें ? मी येथून जाईन ह्मणतों पण माझे पायच मागें निघत नाहींत. पण मी हिची अंगठी बदलली यांत कांहीं विशेष केलें नाहीं. तर हिचें हें कमलासारखें प्रफुल्लित मुख उघडें दिसत आहे त्याचें चुंबन घ्यावें कां ? अथवा काय हरकत आहे. ? हे चारुगात्री--

## साकी.

**त्रैलोक्यांतिल सर्व मधुर त्या पदार्थांहुनी तुझिया ॥ रसभरितचि या अधरोष्ठांचें चुंबन मी घेउनियां ॥ झालों जय शाली ॥ प्रीती दृढ मनिं उद्भवली॥ १ ॥**

( चुंबन घेऊन ) अरे,. ही जागी झाली. आतां येथें रहाणें चांगलें नाहीं.

( जातो. व मनमोहिनी घाबरून उठून कावरी बावरी होते )

**मनमोहनी**—अग, मालिनी, कोठें आहेस ?

**दासी**—( आंतून ) काय ताईसाहेब ?

**मनमोहिनी**—अग लौकर इकडे ये.

**दासी**—(येऊन) ताईसाहेब, अशा घाबऱ्या कां झालांत ? काय झालं ?

**मनमोहिनी**—अग, अताच कोणी तरी येथें येऊन गेलं.

**दासी**—हें आपण कशावरून ह्मणतां ?

**मनमोहिनी**—कशावरून कां होईना. पण येथें कोणीतरी आलें होतें खचित.

**दासी**—मला नाहीं खरं वाटत. महालाच्या बाहेर शिपायांचा जय्यत पहारा आहे आणि येथें हो कोण येणार ? मला वाटतं झोंपेत कांहीं तरी स्वप्न पडून तुह्मी दचकून उठल्या असाव्यांत.

**मनमोहिनी**--होय. मी अगदीं वेडी आहे तेव्हां तूं ह्मणतसं तें खरेंच.

**दासी**—तसं नाहीं ताईसाहेब, आपणास आतांशा जी म-

दनबाधा झाली आहे तिच्या योगानें कधीं कधीं असं होतं यांत कांहीं मोठंसं नाहीं.

**मनमोहिनी**—छे पण येथें कोणी तरी आलंच होतं.

( चहूंकडे पहात पहात बोटांतली बदललेली अंगठी पाहून )

अगबाई, माझ्या बोटातली अंगठी काय झाली आणि येथें ही दुसरी कोणाची ?

**दासी**—( पाहून ) खरंच बाईसाहेब. हें काय बरं झालं ?

**मनमोहिनी**—काय झालं सांगूं कां ? अग, ही तुला मदनबाधा झाली आहे. माझी अंगठी बदलली नाहीं तुला आपलं भ्रमानं तसं वाटतं.

**दासी**—पण बाईसाहेब, इतक्या शिपायांच्या पाहऱ्यांतून येथें येणार मोठाच धाडसी म्हटला पाहिजे.

**मनमोहिनी**—अग, असं जर आतां व्हावयाला लागलं तर पुढें वाट काय आपली ?

**दासी**—बाईसाहेब, मी खचित सांगतें कीं येथें येणारा

कोणीतरी आपणाला पाहण्याकरितां उत्सुक झालेला राजपुत्र असावा. चोराची वगैरे मुळींच शंका नको. कारण तसा जर कोणी असता तर येथल्या कांहीं जिनसा घेऊन जाता. पण तसं कांहीं झालं नाहीं. त्यानं कायतीं आपल्या अंगठी-चीच अदलाबदल केली आहे.

**मनमोहिनी**--( अंगठीकडे नीट पाहून ) अग, इच्यावर कोणाचंस नाव आहे. ( वाचते ) ' चूडामणी. '

**दासी**--काय ' चूडामणी ' बाईसाहेब. हें नांव किती तरी गोड आहे.?

**मनमोहिनी**--अग, पण हा चमत्कार काय आहे तो कळल्यावांचून माझ्या मनाला समाधान वाटणार नाहीं.

**दासी**--बाईसाहेब,, हें कळण्याला उशीर नको. ज्यानें आपणांस आज येथें येऊन पाहिले तो उद्यां खास येणार. तर उद्यां तुह्मीं व मी झोपेंचं नुसतं सोंग घेऊन निजूं ह्मणजे तो ऐताच सापडेल.

**मनमोहिनी**--मग ही गोष्ट आतां इतकीच राहूं दे. जा जाऊन नीज आतां.

राणी—आपणही निजा. ( जाते )

मनमोहिनी—

पद. चाल. व्यर्थ आह्मी अबला.

काय असें घडलें ॥ नकळे हें ॥ ध्रु. ॥ थोर असे कीं चोर असे तो भ्रांतित मन पडलें ॥ १ ॥ सुदैव किंवा दुर्दैव तसें माझें ओढवलें ॥ २ ॥ जें होणें तें घडल्यावांचुनि कोणाही नटळे ॥ ३ ॥

( असें ह्मणून निजते )

प्रवेश २ रा. राजवाडा.

( राणी मुर्तीला तुळशीची पूजा करीत बसली आहे ).

राणी—(हात जोडून) आई जगज्जननी या माझ्या दुःखाचा शेवट आतां कधीं होणार ? ही चांडाळीण राक्षसकन्या घरांत येण्यापूर्वी महाराजांचं मजवर किती प्रेम होतं ? कोणत्याही गोष्टीत माझं मन कधीं दुखवाल्याचं झालं नाहीं. पण आ-लिकडे काय सगळाच उलटा प्रकार झाला. ही चांडाळीण

मेली मागच्या जन्मीची कोण माझी दावेदारीण होती ती या जन्मीं सूड घेण्याकरितां सवतीच्या रूपानं आली. आणखी अवदसेनं काय मोहिनी घालून त्यांचं मन मोहून टाकलं आहे कीं, तिच्या सांगण्यावरून ते माझा अगदीं तिरस्कार करूं लागले. कधीं भाषण करण्याचाच प्रसंग आला तर तो अंगावर ओरडण्याच्या रूपानें यायचा. या कवटाळणीनं माझ्याशीं तर पुरा दावा धरला आहे. मुलींशीं दोन सुखदु:खाच्या गोष्टी बोलूं देत नाहीं. राजस्त्रियांच्या स्वप्नांत येणार नाहींत अशीं भलभलती कामें मजकडून करवत्ये. सर्व दु:ख घटकाभर रडून घालवीन ह्मटलं तर त्याची देखील चोरी ! आतां माझी गति तरी काय होणार ? ( पाहून ) मेली आली वाटतं.

( तदनंतर रागावलेली त्राटिका प्र० क० ).

**त्राटिका**—कायग, आजपर्यंत तुला मी कितीकदां ताकीद दिली कीं, सकाळींच बागेंतलीं चांगलीं सुवासिक फुलं काढून मला वेणींत घालण्याकरितां त्यांचा गजरा करीत जा. व आपल्या हातानें माझी वेणी घालून मी अंग धुतलं ह्मणजे तूं अंग धुवून तुला काय पूजाबिजा करणें असेल ती करीत जा. पण तें न ऐकता तूं आपली हा खटाटोप मांडून बसतेस.

**राणी**—अग, चांडाळणी; मी काय तुझं असं घर बुडवलं आहे ह्मणून सारखी माझ्या पाठीस लागली आहेस ! वाड्यांत दासी कां थोड्या आहेत त्यांच्याकडून तुला हावं तसं कां नटून घेत नाहींस ? मलाच अशी कामं सांगण्यांत तुला काय भूषण वाटतं ?

**त्राटिका**—काय, भूषण वाटतं म्हणतेंस ? अग, त्या सारखं तर मला दुसरें भूषणच नाहीं.—

**पद**. चाल. लोपविलि बहुत शोभा.

**सवतीच्या करीं सेवा करवावी आपुली ॥ याविण ती दुजी इच्छा मज नाहीं राहिली ॥ जरि दासी दास येथें बहुतचि गे नांदती ॥ तरि कामें सर्व तूंतें सांगावीं वाटतीं ॥ १ ॥**

**राणी**—अग, पापिणी, आपल्या मोहिनीजालांनं महाराज पूर्ण मुठींत आले ह्मणून या अनाथ राजकन्येचा तूं असीं भलभलतीं कामें सांगून उपमर्द करावास हें कांहीं चांगलं नाहीं. तुझ्या डोळ्यांत कां बरं मी सलतें ? तुह्मां उभायतांच्या ऐषआरामांत मी कधीं आड येतें कां ? कोणी वाली नाहीं ह्मणून

घटकाभर तुळशीची पूजा करीत बसते ती देखील तुला पहावत नाहींनां ?

**त्राटिका**—तूं ह्मणतेंस तेंच खरें. मला ज्या गोष्टीचा कंटाळा ती तूं जाणून बुजून कां करतेस.—

**पद**. चाल अबला स्त्री ही केवळ.

**या तुळशीची पूजा करण्यापासुनि काय तुला ॥**
**लाभ पुढें तो होइल वाटे लौकरि सांग मला ॥**
**व्यर्थ गंध हीं कुसुमें तैसीं वाहासि तूं इजला ॥ ही**
**सौख्याला मुळिंन खरोखर देइल दुःखाला ॥**
**थाटमाट हा पाहुनि येतो कोपचि चित्ताला ॥**
**लत्ता मारुनि द्यावी वाटे झुगारुनी इजला ॥ १ ॥**

**राणी**—शिवशिव ? परमेश्वरा, कोठें आहेसरे ? या चांडाळणीची जीभ कां झडून पाडीत नाहींस ? किंवा हे शब्द न ऐकण्यास मला कां बहिरी करीत नाहींस ? देवा, तुजशीं नित्य द्वेष करणारे जे राक्षस त्यांची ही कन्या तेव्हां ती तुला असें बोलते हें ठीकच आहे पण इच्या संगतीनें त्यांच्या मनांत तुजविषयीं अप्रीति उत्पन्न होऊं देऊं नकोस इतकेंच मागणें

आहे. ( त्राटीकेस ) अग, राक्षसिणी तुजपुढें मी हात जोडून मागणें मागतें कीं तूं मला हाव्या त्या शिव्या दे; पण मजसमोर देवाची निंदाकरून आपण नरकांत पडून आपल्याबरोबर मला नेऊं नकोस.

**त्राटिका**—करूं नकोंस ह्मणून तूं कोण मला सांगणार? एक वेळ नाहीं हजार वेळ मी असेंच बोलणार. कारण —

**पद**. चाल काय मला भूल. किंवा. अंगिकार करुनि.

**दुःख तुला देण्यामाधिं हर्ष वाटलो ॥**
**मन्मनास कितितरि गे वर्णवे न तो ॥ धृ ॥**
**तूं सवती मम ह्मणुनी हाल तवाचिते॥**
**करण्या मी बहु उपाय नित्य शोधिते ॥**
**समजलिकां इतक्यानें संपलेच्चि तें ॥**
**दुःख खरें असें पुढें बघ अजोनि तें ॥ १ ॥**

पण जाऊंदे तें आतां. मला आतांशी तुझी दया येऊन असं वाटूं लागलं आहे कीं तूं आणि मी दोघीनं गुण्यागोविंदानं रहावं. पण तें तुझ्या कोठून मनांत यायाचें.

**राणी**—काय ? तूं आणि मी गुण्यागोविंदानं रहावयाचं ?

आणखी सात जन्म तरी मला अशी इच्छा करावयाला नको.

**त्राटिका**—न रहावयाला काय झालं ? तूं माझं ऐकलंस तर.

**राणी**—ऐकतें हें काय थोडें आहे ?

**त्राटिका**—हें पहा. तें आतां कांहीं मनांत आणूं नकोस. मला एका कामांत तुझं अनुमत घ्यायचं आहे. तूं नाहीं दिलंस तर माझं तें काम राहील असं नाहीं. पण तुझं अनुमत मिळालं तर फारच चांगलं.

**राणी**—माझं डोकं फोडीत असलींस तरी त्याला माझं अनुमत आहे.

**त्राटिका**—असं भलतंच कशाला मनांत आणतेंस ? मी तुला इतकेंच विचारतें कीं माझा भाऊ भयानक तुला माहित आहेच. तो मोठा शूर असून हल्लीं ब्रह्मदेवाच्या वरानें तो अमर झाला आहे. त्याचं मनं तुझी अथवा माझी ह्मण कन्या जी मन मोहिनी तिजवर बसलं आहे ह्मणून ह्मणते त्याच्याशीं टाकावं तिचं लग्न लावून.

**राणी**—कोण तो भयानक राक्षस ? त्याचे गुण फार चांगले?

तुझाच भाऊ तो. आणि त्याला मी आपली मनमोहिनी दिली तर तू मजबरोबर नीट वागणार; (रागानें) अग चांडाळणी माझा छळ पुरेसा झाला नाहीं ह्मणून आतां कां तिच्या पाठीस लागण्याचा तुझा विचार आहे ? (दुःखानें) हाय हाय देवा ! काय तूं हा आमचा खेळ मांडला आहेस ?

**त्राटिका**—विचार कर; उगीच नाहीं ह्मणूं नकोस; तुझा माझा एकोपा होण्याचा असा प्रसंग पुनः येणार नाहीं.

**राणी**—चल चालती हो येथून; पुनः असले शब्द तोंडावाटे काढलेस तर खबरदार. तुला खात्री असूंदे कीं मनमोहिनीला मी विहिरींत ढकलून देईन पण त्या राक्षसाला देणार नाहीं.

**त्राटिका**—काय तूं माझें ऐकत नाहींस. तर मग संपली तुझी सुखाची आशा. ऐक मी काय आतां ह्मणते तें—

**पद**. चाल. रामासि अनुकुल किंवा. जागें आशेचा.

**विवाह लाविन मनमोहिनिशीं प्रियकर ऐशा मम बंधूचा ॥ कांहीं झालें तरि नच बदलिन निश्चय कधिं जो झाला साचा ॥ १ ॥ सवतीमत्सरभाव**

**पूर्ण तो बघ दाखवितें यावरि तुजला ॥ काय तव करीं असेल माझें अप्रिय करुनी घेई त्याला॥१॥**

**राणी**—मी कांहीं करीत नाहीं, तुलाच माझा काय छळ करणें असेल तो कर. मिळेल त्याचें फळ तुला लौकर. तुझ्या पापाबद्दल तुला कोणत्या नरकांत घालावें याचीच देव योजना करीत आहे.

( एकदम रागावलेला असा चित्रांगद राजा प्र. क. )

**राजा**—( रागानें राणीस ) कायग दुष्टे—

## साकी.

**कोणावरती जळफळसी गे करिसी संतापातें॥शाप भयंकर देउनि कोणा धाडिसि तूं नरकातें ॥ कांहीं नच भीती ॥ वाटतसे कशि तव चित्तीं ॥ १ ॥**

**त्राटिका**—मी नेहमीं सांगतें तें आपणांस खोटं वाटतं ना ? आतां डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलंत म्हणून खात्री झाली. ही नेहमीं मजवर अशीच जळफळत असती. व आपणा उभयतांच्या प्रीतींत विघाड येण्याकरितां देवाला सारखे नवस करीत असती.

राजा-( राणीस ) हूं खबरदार—

पद. चाल. नाहीं सुभद्रा यावातेंते.

व्यर्थ कोप तूं तिजवर ह्मणुनी काय असा करिशी कां गुण तीचे निशिदिनिं तुझिया सलती हृद्यासी ॥ धृ ॥ प्रेमवसे मन्मनिं तिजविषयीं कां न तुला रुचते ॥ देवावरि कां भार घालिसी बिघाड करण्याते ॥ फल न खरोखर मिळेल कांहीं या पाहुनि तूंते ॥ परि जगिं लावुनि कलंक घेशिल अतुल्या वदनासी ॥ १ ॥

राणी—शांत, तुळशी, इजविषयीं माझें मन कसें आहे यांला तूंच साक्ष आहेस.

राजा—कांहीं नाहीं. सर्व मला कळतें आहे—

पद. चाल. झडकरी पात्र जगज्जननी.

खरि अपराधी तूं अससी ॥ सवतीमत्सरभावें तिजवरि निष्ठुरताधरिसी ॥ धृ० ॥ सदा मनामधिं जळफळसी ॥ उणें तिचें शोधुनि बघसी ॥ पाहुनिया तव कृति ऐसी ॥ वाटे कधिंही तवमुखदर्शन नच व्हावें मजसी ॥ १ ॥

**राणी**—महाराज, मीतर ईश्वरास स्मरून वागतें आहे. आतां आपणांस तसें दिसत नाहीं याला माझा काय उपाय? आपणांस ह्या हतभागिनीचा जर इतका तिटकारा येत असेल तर या तरवारीनें एकदां शेवट करून टाका ह्मणजे वाटेल तसें वागावयास सांपडेल.

**राजा**—चलहो चालती येथून. मजसमोर उभी देखील राहूं नकोस. आणखी तुला सांगतों कीं आज पर्यंत झालें तें झालें पण—

पद. चाल. अंजनपरवा अथवा पंचतूंड.

**कधिं यापरिचें भांडण पुनरपि जरि इजशीं तव झालेंलें ॥ मी पाहियलें किंवा कळुनी कोणाकडुनी मज आलें ॥ काय गती मग होईल तुझि ती वद्वे नच मज वाचेनें ॥ ह्मणुनी सवतीमत्सर सोडुनि वागतजा तिशिं प्रेमानें ॥ १ ॥**

**राणी**—महाराज—

**राजा**—खबरदार. आतां अधिक एक अक्षर देखील बोलूं नकोस. चालती हो.

**राणी**—हायरे देवा! ( असें ह्मणून जाते. )

**त्राटिका**—( मनांत ) ठीक झालें. आतां मला समाधान वाटतें.

**राजा**—प्रिये, तुझां दोघींचें आज इतकें भांडण व्हावयाला काय कारण झालें ?

**त्राटिका**-कारण कांहीं नाहीं. माझा भाऊ भयानक याचें आपल्या मनमोहिनीवर मन बसलें आहे, तेव्हां ती त्याला देण्याविषयीं मी तिला विचारिलें तो ती आपली मला शिव्याच देऊं लागली.

राजा-तर मग आजची चूक तुझीच आहे.

**त्राटिका**—काय माझी चूक ! ती कशी ?

**राजा**—अग वेडे, तूं असें भलतेंच विचारलेंस तर तें तिला कसें पसंत पडणार ? पहा.

## दिंडी.

**जिचें सुंदर रूप कीं सुगुण साचे ॥ देवनारीमधिंही न मिळायाचे ॥ काय होईल अनुरूप तिला भर्ता ॥ बंधु राक्षस तव दुराचारकर्ता ॥ १ ॥**

**त्राटिका**—पुरे, पुरे झालें, कन्येचें वर्णन. तें कांहीं नाहीं. मी त्याला मनमोहिनी देण्याचें कबूल करून वचन दिलें आहे.

**राजा**—काय ह्मणतेस ? वचन दिलें ? आपण नाहीं बुवा याला कबूल.

**त्राटिका**—कबूल नाहीं ह्मणजे ? मी नाहीं कांहीं ऐकायची आपण त्याला मनमोहिनी दिलीच पाहिजे.

**राजा**—मी साफ त्याला देणार नाहीं.

**त्राटिका**—एकूण मला आपली जी आशा होती ती सारी निष्फळ झाली कां ?

**राजा**—ह्मणजे मी आपलें तुझें भलतेंच ऐकावें वाटतें ?

**त्राटिका**—नका बरं ऐकूं. शिवशिव देवा ! ( दूर जाऊन )

पद. चाल. व्यर्थ आह्मी अबला.

**सर्वथैव फसलें ॥ कशि तारि मी ॥ धृ ॥ यद्विश्वासावर राहियले त्यानें फसवीलें ॥ १ ॥ वच लग्नामधिं दिलें मला तें सांप्रत तुडवीलें ॥ नको नको मुळिं जनु अबलेचा दुःखामधिं पडलें ॥ ३ ॥**

**राजा**—प्रिये, असा भलताच हट्ट धरून व्यर्थ कां बरं रुसतेस ? ( जवळ जातो )

**त्राटिका**—हां खबरदार माझ्या अंगाला हात लावला

तर. मी तुमची कोणी नाहीं व तुम्हीं माझें कोणी नाहीं. पण प्रिया, असं कां बरं ? खरंच कां माझ्या भावाला आपण मनमोहिनी देणार नाहीं ?

**राजा**—पुन: पुन: कशाला विचारतेस ? खरोखरच मी त्याला देणार नाहीं.

**आटिका**—तर मग हा पहा. मी आपल्या पायापाशीं प्राण देतें.

**राजा**—( घाबरून ) अरेरे ! हें लचांड झालें. प्रिये असें काय करतेस ?

**आटिका**—मी दिलेलें वचन आपण पूर्ण करीत नाहीं तर मग मला जगून तरी काय करावयाचं.

**राजा**—आतां काय बरं करावं. ( विचार करून ) प्रिये, हें पहा मी तुझें ऐकतों पण त्याला वरण्याविषयीं तूं मनमोहिनीचें मन वळविलें पाहिजेस.

**आटिका**—तें माझें काम. मग तर कांहीं हरकत नाहींना ?

**राजा**—कांहीं नाहीं. पण हा पाहिलास कां ?—

## साकी.

आकाशाच्या मध्यावरि हा दिनमणि सांप्रत आला ॥ भोजनकालचि झाला ऐसें सुच-वी तो सकलाला ॥ लौकरि चल कांते ॥ मंगल-स्नाना करण्यातें ॥ १ ॥

**भ्रांटिका**—मी कोठें आपल्या आज्ञेबाहेर आहे ? आज गडे आपण बरोबर मंगलस्नान करूं.

**राजा**—ठीक आहे.

( दोघे जातात. )

### प्रवेश तिसरा—जलमंदीर.

( मनमोहिनी व दासी प्र. क. )

**मनमोहिनी**—हं मालिनी, आटप लौकर कालची त्याची येण्याची वेळ झाली. महालाच्या खिडक्या वगैरे उघड्या ठेवल्या आहेस कां ?

**दासी**—होय सर्व कांहीं करून ठेवलं आहे ?

**मनमोहिनी**—आतां तूं बाहेर झोपेचें सोंग घेऊन जागत रहा आणि मी हाक मारतांक्षणीं आंत ये.

**दासी**—आज्ञे प्रमाणें करितें. मला कधीं झोंप येणार नाहीं.

**मनमोहिनी**—आतां मी इखील झोंपेचें सोंग घेऊन निजतें.

**दासी**—पण ताईसाहेब, जाग्या असा बरं कां ? नाहीं तर खोटी झोंप घेतां घेतां खरीच घ्याल.

**मनमोहिनी**—अहाग वेडे, काय ही तुझी शंका. या चमत्काराचा निर्णय लागल्यावांचून मी नवस केले तरी मला आतां झोंप येणार नाहीं.

**दासी**—बरं, हे हारगजरे अंगावर घालतां ना ?

**मनमोहिनी**—असूंदे ते तसेच. जा तूं आतां ?

**दासी**—( जाते ).

**मनमोहिनी**—आतां येऊं द्या कोण येतें तें ? (शुभ शकून झालासें दाखवून ) पण माझा डावा डोळा कां बरं लवूं लागला—

## अंजनीगीत.

**सर्व सुखें तीं अनुकुल असतां ॥ काय मिळे तें आगाखि आतां ॥ हृदयीं उद्भवली जी चिंता ॥ नाहिंसि होते कां ॥ १ ॥**

( झोंपेचें सोंग घेऊन निजते व चूडामणि प्र. क. )

**चूडामणि**—कालपासून माझ्या मनाची स्थिति काय विलक्षण झाली आहे पहा—

**पद**. चाल दृष्टिस पडल्या किंवा प्रियेविण मजला.

**मनमोहिचें दर्शन घडलें॥त्या योगे मन चंचल झालें॥ जणुं रूप तिचें विषयाचि त्याच्या करमणुकीचा होउनि बसलें ॥ धृ. ॥ तिजला आतां बघण्या वांचुनि ॥ चैन नच पडे मजलागोनी ॥ झालों मन्मथवश विसरुनिया गेलों कार्यचि जें शिरिं धरिलें ॥ १ ॥**

असो. एकदां आपण मनाच्या स्वाधीन झाल्यावर तें नेईल तिकडे गेलें पाहिजे. कालच्याप्रमाणें या सुंदरीच्या महालाच्या गच्चीवर तर मी आलों; आतां आंत जावें. ( तसें करून ) आज माझ्या मनाची स्थिति द्विधा झाली आहे —

साकी.

वेळ असे ही दुसरी ह्मणुनी एकिकडे कमि भीती ॥
वाटे होइल परि न कळे तो दुसरिकडे काय गती ॥
दैवावरि अपुला ॥ सर्व भार मी टाकियला ॥ १ ॥

( पाहून ) अरे, ही सुंदरी तर कालच्याप्रमाणेंच निद्रिस्थ आहे. मग आज हा सर्व महाल नीट पाहूं या.

मनमोहिनी—अगबाई हा महालांत प्रकाश कसला पड ला ? आणखी मी कोणाला पाहतें आहें ? अहाहा !—

पद. चाल. सुटला पितृदिशेचा.

किति सुंदर रूप असें याचें ॥ यौवन मुसमुसलें बहु साचें ॥ मुखदर्शन वाटे विकसन्न नव कमलाचें ॥ कीं येणें झालें हें निष्कलंक शशिचें ॥ १ ॥
अथवा पाहुनि मज एकटिला ॥ हातीं घेउनि सुमचापाला ॥ शरसंधानास्तव कामदेव हा आला ॥ धरि धीर मना फल शकुनाचें मिळेल तुजला ॥ २ ॥

असो आतां असेंच घटकाभर पडून पहावें हा काय करतो तें ?

चूडामणि—समयीचा प्रभाव काय विलक्षण आहे पहा.

काल मला येथें उभें राहण्याला देखील धैर्य होत नव्हतें; पण आज या पलंगावर बसावेंसें वाटतें.

**मनमोहिनी**-मनांत असेल तर हा पलंग दुसऱ्याचा नाहीं.

**चूडामणी**—( पाहून ) अरे, पण या तावकांत हे हारगजरे कसले? सुंदरीनें मला घालण्याकरितां तर ठेवले नाहींत ना?

**मनमोहिनी**—( आपल्याशीं ) जरी त्या हेतूनें ठेविलेले नाहींत तरी आपण ते अंगावर घातलें तर मला किती आनंद होईल पण.

**चूडामणी**—कांहीं असो. घालतोंच. ( तसें करितो ) अरे येथें ही गुलाबदाणी भरलेली आहे. आणि आज उष्मा तरी किती होत आहे. असो. या गुलाबपाण्यानें त्याची शांति करूं? [ तसें करून ] अरे, मजप्रमाणेंच या सुंदरीला देखील उष्मा फार होत असेल नाहीं? तर तिच्या अंगावर यांतलें गार पाणी शिपडूं कां?

**मनमोहिनी**—( आपल्याशीं ) देवा! इतकें माझें भाग्य आहे कां?

**चूडामणी**—अथवा, तसें करण्यास कसली हरकत आहे? हें सुंदरी—

दिंडी

करें सिंचुनिया हें गुलाबपाणी ॥ तुझी सेवा करितसे मना आणी ॥ निरंतर जरि योग हा असा येई ॥ कोण दैवाचा मजहूनि जगीं पाही ॥ १ ॥

**मनमोहिनी**--[ आपल्याशी ] अगबाई, आतां तर मला कसेंसेंच होऊं लागलें [ उठून बसते ].

**चूडामणी**—अरे, हें काय झालें ? हिनें मला पाहिलें ? आतां हिनें कोणास हाक मारली तर ? पळून जाईन ह्मटलें तर विमानही बाहेर राहिलें ?

**मनमोहिनी**---आपण कोण आहांत व येथें कशाला आलांत ?

**चूडामणी**--( भीतीनें ) मी-मी कां-कांहीं को-कोणी चो-चोर नाहीं.

**मनमोहिनी**--मनीं असें तें जनीं दिसें ह्मणून ह्मणतात तें खोटें नाहीं. मी आपणांस कधीं चोर ह्मटलें ?

**चूडामणी**—सुंदरी—

**पद**. चाल होइल कलह ह्मणोनी.

त्रिभुवानिं नच कवणाला ॥ विधि देई तुज सौंद-

**यांला ॥ धृ० ॥ कीर्ती ऐकूनिया गे तुझि ही ॥ बघण्या येथें आलों पाही ॥ चाल ॥ हेतु सफल तो झाला ॥ ऐकियलें वरि मधुवचनाला ॥ १ ॥**

या खेरीज अन्य हेतु मुळींच नाहीं. आतां याची मला क्षमा कर. हा मी चाललों.

**मनमोहिनी**—वाहवा ! चाललांत कोठें ? जें चोरून चाललांत तें परत टाका. नाहीं तर शिपाई पाठवून परत आणीन.

**चूडामणी**—मी तुझें कांहीं देखील चोरलें नाहीं मग परत काय टाकूं ?

**मनमोहिनी**—[ लीनतेनें ] असें कां बरं म्हणतां ? मला दर्शन देऊन आपण माझें मन नाहीं कां चोरून घेऊन चाललांत?

**चूडामणी**—अहाहा ! सुंदरी, तुझ्या मनाचा चोर होण्यापेक्षां जगांत दुसऱ्या पदवीची कोण इच्छा करील ? बरें पण याला शिपाई कसा परत आणणार ?

**मनमोहिनी**—त्याला परत आणील असाच वस्ताद शिपाई मजपाशीं आहे. कोण तो सांगूं कां ' माझें प्रेम. '

**चूडामणी**—आपल्या स्वरूपायोग्यच विधात्यानें चातुर्य दिलें आहे यांत नवल नाहीं.

**मनमोहिनी**—काल माझ्या अंगठीची बदलाबदल करायाला कोणी सांगितलं ?

**चूडामनी**–कोणी ह्मणजे ? त्याच तुझ्या प्रेमानें. सुंदरी तुझ्या भाषणानं मी आतां अगदीं निर्भय झालों.

**मनमोहि–नी**पण असं उभे राहून किती वेळ बोलावयाचं. खालीं बसावं.

**चूडामणी**—( पलंगावर बसून ) आज मजसारखा भाग्यवान् कोण आहे ?

**मनमोहिनी**—महाराज, सर्व राग सोडून या दासीनं कांहीं विचारलं तर सांगाल कां ?

**चूडामणी**–राग आला होता कधीं तर सोडावयाचा आहे ? आपण विचारा काय विचारावयाचं तें ?

**मनमोहिनी**–

अंजनीगीत.

**कवण्या वंशीं जनु तो अतुला ॥ देश वास करुनी भूषविला ॥ उत्कंठा हें ऐकायाला ॥ मन्मनिं बहुलागे ॥ १ ॥**

**चूडामणी**––सुंदरी. ऐक––

पद. चाल. कुळें चतुर्दश किंवा परमसुवासिक.

यक्षराजसचिवाचा सुत मी चुडामणि हें नाम मला ॥ वास असे मम अलकावतिमधिं दुर्लभ जी कीं मनुजाला ॥ मित्र तात तशि जननी नकळे गेली कोठें सोडुनिया ॥ मध्यमलोकीं धनदाज्ञेनें आलों त्यानां शोधाया ॥ २ ॥

मनमोहिनी—( हें ऐकून दुखित होते. )

चूडामणी—सुंदरी, माझें वर्तमान ऐकून तूं अशी दुःखित कां झालीस ?

मनमोहिनी—महाराज, काय सांगू ?

पद. चाल. असुनि तुझें सुख फारही.

पाहुनि अपुलें रूप मनोहर ॥ भाषण ऐकुनि तसें मनोहर ॥ धृ. ॥ वाहियलें हें मन या चरणीं सोडुनि सर्व विचार ॥ आशा धरिली मी बहु मोठी नाहीं जिस मुळिंपार ॥ १ ॥ परंतु आपण यक्ष थोरं ही मानव कन्या हीन ॥ अंगीकृत नच कराल ह्मणुनी मन होय उदासीन ॥ २ ॥



**चूडामणी**—पण या कोंटीकमांत आतां किती वेळ घालवावयाचा ? हा पहा प्रातःकाळ झाला.

**पद.** भाषण किति मधुर.

**आज्ञा मज झडकरि दे जावयास सुंदरी ॥ परतुनि तुज भेटाया येतो वध लौकरी ॥१॥ या भूतळिं आज अशी लाभे मज कामिनी ॥ ह्मणुनी हा धन्य दिवस मानितसे मी मनीं ॥ १ ॥**

( मनमोहिनी त्याला प्रेमानें आलिंगन देऊन जावयास निरोप देते व पडदा पडतो. )

## अंक दुसरा समाप्त.

---

( विनंती—पान ४९ मध्यें शेवटचे त्राटिकेचें भाषण संपल्यावर खाली दिलेलें राणीचें भाषण वाचून मग राजाचें वाचावें. )

**राणी**—अगबाई ! केवढें तरी उलटे काळीज हें ? माझ्याच वाटेल तसा छळ करतेंस आणि जवळ खोटें देखील सांगावयास मागें पुढें पहात नाहींसना ?

# अंक तिसरा.

## प्रवेश १ ला. मनमोहिनीचें जलमंदिर.

( आसनस्थ मनमोहिनी व दासी प्र. क. )

**मनमोहिनी**—( दुःखानें ) परमेश्वरा—

**पद**. चाल. धावुनि दिधलें किंवा धीर न धरवे.

**कां मम जननीवरती स्वमनीं निष्ठुरता बहु धरिसी ॥ सवतीकडुनी नानापरिचा छलवाद तिचा करिसी ॥ धृ ॥ जी बाबांची प्राणाहुनिही पूर्वी तिजवरि प्रीती ॥ होती एकाएकी आतां कशि नाहिंसि झाली ती ॥ राज्ञी असुनीही सर्वांची नच कोणी मानीती ॥ विटंबना तिचि ऐकुनि ऐसी न सुचे कांहीं मजसी ॥ १ ॥**

( दासीस ) बरं, मालिनी, मग पुढें काय झालं ?

**दासी**—पुढें थोरल्या बाईसाहेबांनीं आपण अपराधी नाहीं अशी महाराजांची खात्री करण्याचा आपल्याकडून

पुष्कळ प्रयत्न केला पण सरकारांनीं तें कांहीं न ऐकतां त्यानां एकदम तेथून निघून जा ह्मणून सांगितलं. मग त्या अधिक काय बोलणार ? तशाच दुःख करीत घरांत गेल्या.

**मनमोहिनी**—एकूण त्या चांडाळणीनं बाबानां अगदीं आपल्या मुठींत आणून ठेवलं अं. गडे, मालिनी, हा चाललेला प्रकार मला कांहीं ठीक दिसत नाहीं. ती आज माझ्या आईचा छळ करित आहे; कांहीं दिवसांनीं माझ्या देखील पाठीस लागेल.

**दासी**—ताईसाहेब, आणखी मला सारजेनं सांगितलेलं मी तुम्हांस सांगावयाला विसरलेंच. ती आपल्या भावाला तुह्मांला देण्याविषयीं सरकारास म्हणत होती.

**मनमोहिनी**---काय त्या राक्षसाला मला देण्याविषयीं बाबानां म्हणत होती ?

**दासी**-नुसतं म्हणत होती इतकंच नाहीं तर त्याबद्दल त्यांचं वचन देखील तिनं घेतलं. मात्र ते देतानां इतकंच केलं कीं त्याला वरण्याविषयीं परस्पर तिनं तुमचं मन वळवावं.

**मनमोहिनी**-हायहाय ! एकूण मला वाटल्याप्रमाणें त्या राक्षसिणीनं माझा छलवाद करण्याचा बेत केला अं. ?

पण कांहीं करो ती. मी माझा झालेला निश्चय तिळभर देखील बदलणार नाहीं—

पद. चाल. बलसागर तुम्हि किंवा सुखोपभोगा.

**यक्षशिखामणि चूडामणिच्या सुंदर रूपाला ॥**
**पाहुनि भुलुनी मन्मन हें मी अर्पियलें त्याला ॥१॥**
**कोणाला नच त्यापासुनि तें आणवेल मागे ॥**
**जनकासम त्याविण पुरुषासी मी मानियले गे॥२॥**
**कर जोडुनि तुजपाशीं देवा मागतसे हेंची ॥**
**प्राणांतीं नच पालटवी ही मति माझी साची॥३॥**

पण काग मालनी, सारजेनं तुला सांगितलेलं सारं खरं असेल कां ?

**दासी**—तिनं माझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगितलं आहे तेव्हां खोटं म्हणतां येत नाहीं. पण त्या संबंधानं इतका विचार कशाला ? बहुतकरून ती आजच तुमचें मन वळवण्या करितां येईल.

(पडद्यांत) 'मालिनी अंगं मालिनी, मनमोहिनी कोठें आहे ?'

**दासी**—पहा, ताईसाहेब, मी नांव घेण्याचा उशीर तों त्या आपल्या आईसाहेब आल्याच.

**मनमोहिनी**—खरंच बाई. चांगलं करण्याला कोणी यायचं नाहीं असं. जा तिला घेऊन ये. आणखी, या गोष्टीसंबंधानं आपण अगोदर चकारशद्ब देखील बोलावयाचा नाहीं हें ध्यानांत ठेव बरंका ?

**दासी**--मी आपली आज मुळींच गप्प बसते.

( जाते व त्राटिकेला घेऊन येते )

**मनमोहिनी**—कोण आई, येग. आज किती दिवसांनीं तुला माझी अठवण झाली तरी ही.

**त्राटिका**—बरं, अगोदर खाली बैस. ( दोघी तसे करितात ) आतांशा तुझी प्रकृति कशी आहे मला सांग पाहूं.

**मनमोहिनी**—मी येथें येऊन राहिल्यापासून बरी आहे हो आई.

**त्राटिका**—छे, तूं अगदीं खोटं सांगतेंस. मला तर बाई तुझी प्रकृती अधिकच बिघडलेली दिसते. पहा—

**पद. चाल. नाहीं कोणीही हुंगीले.**

**पांडुरता या तव तनुवरती ॥ सांप्रत तनये किति आली ती ॥ दुग्धाच्या स्नानानें होती ॥**

**तप्ता पुतळी जशि स्वर्णाची ॥ १ ॥ तेज कसें तें न दिसें वदनीं ॥ गाल तसे बघ गेले बसुनी ॥ कंकण गळतें हातामधुनी ॥ इतकी कृश कशि झालिस बाई ॥ २ ॥**

पण या सर्वांचं कारण अद्यापि तुझं लग्न न झाल्याकारणानं अहोरात्र तुला त्याची काळजी लागली आहे हेंच. जरी तूं लाजेमुळें मला सांगण्यास संकोच करीत असलीस तरी माझ्या पुरं लक्षांत आलं आहे.

**मनमोहिनी**—आई, तूं ह्मणतेस तसं जरी असलं तरी त्या काळजीचा शेवट करणं हें केवळ दैवाच्या हातीं आहे मग उगीच तुह्मांला सांगून मजप्रमाणेंच तुह्मांलाही दुःख करावयाला लावण्यांत काय बरं अर्थ आहे ?

**आटिका**—अग वेडे, केवळ दैवावर हवाला ठेवून आपलं दुःख मनातल्या मनांत गिळून टाकल्यानं कसा बरं निभाव लागणार ? बरं असो. तूं जरी कळवलं नाहींस तरी आह्मांला कांहीं त्याचा विचार केला पाहिजेना ? नाहीं तर उद्यां लोक तुला पोर ह्मणतील पण आह्मांला नांवें ठेवतील. बरं पण मनमोहिनी, आह्मी पसंत केलेला नवरा तुला आवडेल कां ?

**मनमोहिनी**—( मनांत ) चांडाळणीनं आपल्या विषयाला प्रारंभ केला. ( उघड ) हें ग काय आई तुझं मला विचारणं तुह्मीं करणार तें माझ्या अकल्याणाकरितां कां ? त्यांत मला पण काय समजतं ?

**त्राटिका**—तर मग तिकडचा व माझा असा विचार झाला आहे कीं माझा भाऊ जो भयानक राक्षस त्याशीं तुझं लग्न लावावं, ह्मणजे तुझी सर्व काळजी दूर होईल. व घरांतल्या घरांत हा संबंध झाल्यानं तुझं कधीं वियोग दुःख भोगण्याचा आह्मांलाही प्रसंग येणार नाहीं.

**मनमोहिनी**—( रागानें ) वाहवाग आई, एखाद्या दुःखीकष्टी मनुष्याची थट्टा कशी करावी हें तुला पण चागलं समजतं हो.

**त्राटिका**—अग, यांत थट्टा कसली ? खरंच त्याला तुला देण्याचा आम्ही बेत केला आहे. कारण त्याचें सामर्थ्य पहा—

**पद.** चाल. उद्यां बघ जातें.

**किति शूर असे ॥ जन त्या थरथर कांपतसे ॥**
**॥ धृ० ॥ ठाऊक साऱ्या राक्षसिमाया ॥ विधिनें**
**केली अमराचि काया ॥ कामि रूप नसे ॥ तुजला**

**वर बहु शोभतसे ॥ १ ॥ क्षणांत जिंकुनि सारी क्षोणी ॥ करील तुज गे तत्स्वामीणी ॥ मग सांग कसें ॥ तुजवरी तन्मन पूर्ण बसें ॥ २ ॥**

**मनमोहिनी**–अगबाई, मी कोठें आहे ? जागी आहे कां स्वप्न पहात आहे ? काय ऐकलें ? आई, तूंच कां बोललीस हें ? छे बाई हें कांहीं माझ्यानें ऐकवत नाहीं. (असें ह्मणून उठून जाऊं लागतें. )

**त्राटिका**—( तिचा हात धरून ) अग चाललीस कोठें ? मी तुला विचारलें काय ? आणि त्याचें कांहीं उत्तर न देतां तूं असें भलतेंच काय करतेंस ?

**मनमोहिनी**—आई, येथें कशाला बसूं ? आणि तुला उत्तर काय देऊं ?

पद. चाल. सुकुमार असुनि

**तूं माय बोलसी काय वाटते हाय ऐकुनी मजसी॥ मजवरि ममता नच राहिलि तव कैसी ॥ भूवरी कोणि नच वरी काय मज तरी राक्षसा देसी ॥ निर्दयतेची कृति अशि कां गे करिसी ॥ १ ॥**

**त्राटिका**—मनमोहिनी, असें काय भलतेंच मनांत आणतेंस हें ?—

पद. चाल. झाली ज्याची किंवा दारिद्र्यानें

अज्ञानी तूं असती बाला ॥ यामधि कांहीं नकळे तुजला ॥ धृ. ॥ विचार आह्मी तव लग्नाचा ॥ पुरता आधीं करुनी साचा ॥ नंतर तुज गे त्या दे-ण्याचा ॥ आहे बघ हा निश्चय केला ॥ १ ॥ तरि आतां हे कुतर्क भलते ॥ टाकुनि होई अनुकुल याते ॥ पाळुनि वडिलांच्या आज्ञेते ॥ भूषण आणी निजवंशाला ॥ २ ॥

मनमोहिनी—नको नको आई; या गोष्टिला अनुकूल हो ह्मण्यापेक्षां—

पद. चाल. पांडुनृपति किंवा खरतर कामाग्नि.

सांगशील मुलिला या ॥ वापींत उडि टाकाया ॥ किंवा विष ते प्याया ॥ वाटते बरें ॥ १ ॥ अथवा कधि नाहीं जरि ॥ मद्विवाह झाला तरि ॥ दुःख न मज मुळि अंतरिं ॥ जाण होय गे ॥ २ ॥

त्राटिका—( रागानें ) कार्टे, समजलें तुझ्या मनांतील हेतु. मुलींच लग्न न करितां पुढेंमागें आमच्या नांवाला कलंक लावायाचा तुझा विचार आहे—

पद. चाल. रामकरी जरी.

**स्त्रीजातीची लज्जा कैसी ॥ आज सर्व तूं सोडुनि देसी ॥ मर्यादाही विसरुनि जासी ॥ वदसी भलभलतें ॥ १ ॥ आनंदानें वराशिल त्यातें ॥ ऐसें मजला वाटत होतें ॥ परंतु बघुनी या तव कृतितें ॥ ग्रह तो मम फिरला ॥ २ ॥**

पण, खचित सांगतें कीं आम्ही त्याला तुला देण्याचा एकवार जो निश्चय केला आहे तो तूं आतां कांहीं जरी सांगितलेंस तरी फिरला जाणार नाहीं. म्हणून तुला म्हणते कीं तूं आपला सर्व हट्ट सोडून आम्ही करूं त्याप्रमाणें वाग नाहींतर तुला बळजबरीनें आम्ही त्याला देणार.

**मनमोहिनी**—आई, असें करणें तुला बरें वाटतेंना?

**त्राटिका**—होय. आणखी, तूं अनुकूल झालीस म्हणजे अधिक बरें वाटेल.

**मनमोहिनी**—तर मग मी खचित सांगतें कीं तूं कांहीं केलेंस तरी मी तुझ्या म्हणण्याला कबूल होणार नाहीं.

**त्राटिका**—काय? नाहीं म्हणतेंस? बरोबर आहे. तूं मला

असेंच म्हणणार ? आतां त्यांच्याकडून तुझे चांगलें कान उपटते म्हणजे तूं शुद्धीवर येशील.

**मनमोहिनी**—काय तुला वाटेल तें कर जा; पण हें तुला पुरें ठाऊक असूं दे कीं—

पद. चाल. आम्रमंजरी तुलाही.

**नच कधिं तव हेतु हा ॥ मानिंचा ॥ होइल सफल-**
**चि पहा ॥ ध्रु ॥ महानदी ती सागर सोडुनि ॥**
**नच ओढ्याला मिळेल जाउनि ॥ तेजोनाथ तो**
**दिनमणि टाकुनि ॥ दूर न राहिल महा ॥ १ ॥**
**बळेंचि मजला देतां त्यातें ॥ घेउनिया मग गळ-**
**फांसातें ॥ अथवा वर्जुनिया अन्नातें ॥ देईनगे**
**प्राण हा ॥ २ ॥**

**त्राटिका**–पहा कशी कारटी चुरचुर बोलते ती ! बरं तर मग रहा अशी आपल्याच घमेंडीत. लौकरच पाहते त्याला कशी वरीत नाहींस ती—

पद. चाल. सफलेच्छाती.

**दया तुझी मुळिं मजला आतां ॥ वाटतसे कीं नच**
**या चित्ता ॥ हितकारक तव तुजला कथितां**

**कैसें नायकसी॥पोरी॥ लहान तोंडीं मोठ्या घांसा घेण्या कां बघसी ॥ पोरी ॥ १ ॥ बळेंचि तुज मी देइन त्याला ॥ प्रियकर ऐशा ममबंधूला ॥ बघते यांतुनि सोडविण्याला ॥ आणिसि कवणासी ॥ पोरी ॥ लहान तोंडीं मोठया घांसा घेण्या कां बघसी ॥ पोरी ॥ २ ॥**

( असें ह्मणून रागानें निघून जाते. )

**मनमोहिनी**—जा. कर एकदां काळें इथून. ( दासीस ) मालिनी, चांडाळणीची कशी चांगली पूजा केली ती पाहि-लींस नां ?

**दासी**—ताईसाहेब, आपण अगदीं माझ्या मनाजोगतं केलं. जशास तसंच पाहिजे. पण आतां ही सरकाराजवळ आपणाविषयीं काय सांगेल तें कळत नाहीं.

**मनमोहिनी**—कांहीं कां सांगेना मेली. आतां मी आपलं हृदय अगदीं दगडासारखं कठीण केलं आहे, बरं तूं जा. आणि भोयानां मेणा तयार करावयास सांग. मी आज आपल्या आईला भेटावयाला जाते.

**दासी**–( जाते. )

**मनमोहिनी**–बाबा, आपण काय केलं हें ?—

पद. चाल. पुरे पुरे ही कपटस्तुति.

**मनमोहिनि ही निजतनया ॥ अर्पण करु त्या अनुरूप असा राजपुत्र कुणि पाहुनिया ॥ धृ. ॥ वच पूर्वी हें जननिस देउनि ॥ सांप्रत त्याची अठवण विसरुनि ॥ विपरित ऐसे कां करितां जनिं ॥ राक्षसास मज देउनिया ॥ १ ॥**

( दासी येऊन मेणा तयार आहे ह्मणून सांगते व मनमोहिनी जाते )

## प्र. २ रा. सुशीला राणीचा महाल.

( सुशीला राणी व मनमोहिनी प्र. क. )

**मनमोहिनी**—आई, माझ्या जन्माची काय ही विटंबना मांडली आहे ?

पद. चाल. दारिद्र्यें जनकाची.

**काय नको तुह्मां ही जाहली सुता ॥ धृ० ॥ इजवरचें ह्मणुनीया ॥ सर्व प्रेम सोडुनिया ॥ देण्यातिस राक्षसास आज योजितां ॥ १ ॥ नचजननी**

**जनकासी ॥ शोभतसे कांति ऐसी ॥ आनंद मज वरण्या त्यास सांगतां ॥ २ ॥**

**राणी**—बाळे, मनमोहिनी, तुला मी काय सांगूं ? माझी काय स्थिति आहे ती तूं पहातेच आहेस. मला कोणी विचारते आहेकां ? एखाद्या मोलकरणीला जो मान असतो तो देखील मला नाहीं. रात्रंदिवस ही अवदसा माझ्या पाठीस लागली आहे ! महाराजांनीं तर मुखावलोकन देखील करण्याचं टाकलं. बरं, इतका माझा छळ करूनही तिची तृप्ती न होतां ती आतां तुझ्या पाठीस लागली आहे. तर आतां मी करूं तरी काय ? देवा ! कोठेंरे तूं दडून बसला आहेस ?

**मनमोहिनी**—आई सारं खरं. पण आतां त्या चांडाळणीच्या सांगण्याप्रमाणें मी त्या राक्षसाला वरून आपला सर्व जन्म दुःखांत घालवूं कां ? माकडाच्या गळ्यांत मालतीची माला घालावी तशी ही बाबांची कृति नाहीं कां ? त्यानां जर ही कार्टी नको झाली होती तर समुद्रांत टाकून द्यायची होती. पण हा व्यर्थ जुलूम तिजवर करावयाचा नव्हता ! आई, माझातर निश्चय असा झाला आहे कीं प्राण गेला तरी पुरवला, पण ज्या योगानें जगांत माझें हंसे होईल अशी ही गोष्ट मी कधीं कबूल करणार नाहीं.

**राणी**—बाळे, कायकरूं? तुझ्याकडे पाहून माझा जीव तिळतिळ तुटतो, पण या दुःखांतून तुला सोडविण्याचें कांहीं देखील साधन माझ्या हातीं नाहीं. जशी माझं दुःख पाहून कळवळणारी एक तूंच आहेस तशी तुझं दुःख पाहून कळवळणारी एक मीच आहे. परमेश्वरावांचून आपली कींव करणारा आज दुसरा कोणी नाहीं.

**मनमोहिनी**—आई, ह्मणूनच या अशा जिवंत मरणापासून मी आपली सुटका करून घेण्याचा बेत योजला आहे.

**राणी**—( घाबरून ) ह्मणजे? तुझा काय विचार आहे?

**मनमोहिनी**—दुसरा भलता कांहीं नाहीं. पूर्वी मजसारख्या दुर्दैवी राजकन्यावर असे प्रसंग आले असतां त्यांनीं जसें केलेलें मी ऐकलें आहे त्याचप्रमाणें मी करणार आहे.

**राणी**—तरी मुली, तूं काय ह्मणतेंस तें मला कळत नाहीं.

**मनमोहिनी**—आई, माझ्या आनंदानें सुख पावणारी त्रिभुवनांत आज एक तूंच आहेस तेव्हां तुला न सांगावं असं मला कसं बरं वाटेल. ऐक—

पद. चाल. भूपती खरे.

**शिशुपाल भूप तो पति अपुणा योजियला॥वर्तमान**

**दुःखद हें कळतां रुक्मिणिला ॥ १ ॥ श्री कृष्णावरती मन अपुलें ठेवुनिया ॥ बघ शेवटि झाली ती त्याची गे जाया ॥ २ ॥ तरि तिजसम साहस सांप्रत मी करुनीया ॥ अनुरूप असा वर काढियला शोधुनिया ॥ ३ ॥**

**राणी**—मनमोहिनी, खरच कां हें ? बाई हें ऐकून मला एकपरी समाधान व एक परी दुःख वाटतं. बरं पण तूं त्या जलमंदिरांत असतां त्याला कसा शोधून काढलांस ?

**मनमोहिनी**—आई, परमेश्वराची मजवर मोठी कृपा ह्मणून तो आपणच होऊन मजकडे चालून आला, व तो मला पसंत पडल्यामुळें मी त्याचा स्वीकार केला.

**राणी**—तूं शहाणी व चतुर आहेस तेव्हां तुला जो पसंत पडला तो खचित रूपगुणानीं चांगलाच असेल. बरं पण तो कोणत्या प्रांताचा राजपुत्र व तुजसभोंवती इतका बंदोबस्त असतां तुला भेटला कसा ?

**मनमोहिनी**—आई त्याची हकीगत काय सांगावी ? तुला ऐकून खरी देखील वाटणार नाहीं. पहा—

**पद्.** चाल. सुखोप भोगा किंवा अनुपम सुंदर.

**नच राहे तो या महिवरती मानवही नाहीं ॥ यक्ष थोर गे अलकावतिमार्धि वसे सदा पाही ॥ १ ॥ मित्रतात जननिस शोधाया या लोकीं आला॥दैव-बळें पति मज लाभे जणु नलदमयंतीला ॥ तो रूपानें लाज खरोखर आणिल मदनाला ॥ त्या वरण्याचा तरि निश्चय मम असे पुरा झाला ॥२॥**

तर आई या माझ्या कृत्याला तुझी संमति असावी. या लोकचें आपलें कार्य झाल्यावर माझा अंगिकार करण्याविषयीं त्यानीं मला वचन दिलेलें आहे.

**राणी**—बाळे, सांप्रत तुजवर तसाच दुःखाचा प्रसंग आला आहे तेव्हां मी तुला नाहीं कसें ह्मणावें ? पण वये, जें करणें तें पूर्ण विचार करून कर. आणखी, त्याचें तुझें लग्न होऊन त्याच्या बरोबर तूं अलकावतीस गेलीस तर माझी आठवण असूं देत जा.

**मनमोहिनी**—आई, हें कां तू मला सांगावयास पाहिजेस. आपल्या आवडत्या आईचा मला कधीं तरी विसर पडेल कां ? ( समोर पाहून ) पण हें काय ? त्या चांडाळणीसह रागावलेले असे बाबा इकडे येताहेत.

( रागावलेला चित्रांगद राजा त्राटिके सह प्र. क. )

**राजा**—कोठें आहे ती कार्टी ? मनमोहिनी, काय विचार मांडला आहेस हा ?

**पद.** चाल. लक्ष्मीसम चंचल ही.

**वडिलांची आज्ञा नच केंवि मानिशी ॥लज्जा तशि मर्यादा आज सोडिशी ॥ धृ. ॥ पति जो मी यो-जियला ॥ आवडे न काय तुला ॥ बाळुनि दुर्वच-नाला ॥ धिःकारिसि जननीला ॥ स्वभाव जो तव पहिला ॥ सर्व कसा पालटला ॥ दुःख होय मज कृति तव पाहुनी अशी ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—बाबा, या एकुलत्याएक पोटच्या गोळ्याचं कल्याण व्हावं अशी आपली मनापासून इच्छा असतां अशा भलत्याशींच जन्माची गांठ घालून माझा छळवाद कां बरं करितां ?

**त्राटिका**—कशी कार्टीची जीभ वळवळती आहे पहा ! चांगलें करीत असतां माझा छळवाद करितां म्हणते. वाहवा काय शहाणपण आहे पण ?

**राजा**—तें कांहीं असो. मनमोहिनी—

## साकी.

**आजवरी मम आज्ञा कशि ती नच तूं अवमानीली ॥ या साठीं या कार्यामधिंही नच मोडी या कालीं ॥ मी तुज कथितों तें ॥ मानी हितकारक दुहिते ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—बाबा, मी तुमच्या पायां पडते. आपणासमोर उद्धटपणानें बोलतें याची क्षमा करा. तुह्मी प्रेमानें माझा तिरस्कार केला तरी तो देखील मला हितकारकच होईल पण ज्या योगानें तुमची जगांत दुष्कीर्ति होऊन मला आजन्म दुःख होईल अशा राक्षसाशी माझें लग्न करण्याच्या भरीस पडूं नका.

**त्राटिका**—( राजास ) कां माझी मनमोहिनी मोठी आज्ञाधारक आहे ह्मणून फुशारक्या मारीत होतानां? आतां पहा कशी उलट तुह्मांलाच ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगते आहे ती!

**राजा**—( रागानें ) पारेट, काय बोलतेंस हें? काय आह्मी जो तुला नवरा पाहिला त्याशीं लग्न करण्यास तुझी खुषी नाहीं ह्मणतेंस? अरेरें काय करूं?

पद. चाल. नाहीं सुभद्रा या वार्तेते.

**भाषण हें तव सर्वांगाची लाही मम करितें ॥ कु-**
**मारिका व्रत सोडुनि वदसी कैसें भलभलतें ॥धृ॥**
**वाटतसे तूं नच मम असशी खरोखरी दुहिता ॥**
**प्रीती तुजविषयीं मनिं यागे राहिलि नच आतां ॥**
**नच निज छंदें वागायाचा विचार सुखदाता ॥**
**गर्भांमाधिं जरि असतिस मेलिस फार बरें होतें ॥१॥**

**राणी**—हें असें काय ह्मणून पण तिला भलभलते बोला-चयाचें ? लग्नाची गोष्ट ह्मटली ह्मणजे होईल तितकी दोघांच्या विचारानें झालेली बरी. तिच्या मनांत नसेल तर विनाकारण तिजवर इतकी बळजबरी कशाला ? त्याला कांहीं दुसऱ्या बाय-कांचा तोटा नाहीं. बरं इलाहीं कोणी राजपुत्र पतकरणार नाहीं असें नाहीं.

**त्राटिका**—या बाईसाहेबांच्या अशा उपदेशामुळेंच तर पोरगी इतकी शेफारून गेली आहे बरं ही.

**राजा**— ( राणीस ) खबरदार. या कामांत तूं एक अक्षर देखील बोलूं नकोस ? तुझ्या अशा भाषणानेंच तर आज ही कार्टी माझा उघड उपमर्द करूं लागली.

**राणी**—बाबा, मी आपला उपमर्द करिते असें जर आपल्यास वाटत असेल तर एकदम आपल्या हातानें माझे दोन तुकडे करा. त्याबद्दल देखील मी तुमची अत्यंत उपकारी होईन. पण जें कधीं माझ्या ध्यानीं मनीं देखील नव्हतें असें हें कृत्य करण्यास मला लावूं नका.

**राजा**—पोरटे, चलहो एकीकडे. तुझें कांहीं देखील मला ऐकावेसें वाटत नाहीं. आतां तूं काय समजली आहेस—

पद. चाल. व्हावा लाभ तुझा.

**बघ त्या राक्षसतनयाला ॥ अर्पण करावया तुजला ॥ आहे निश्चय मम झाला ॥ कधिंही जाइल नच फिरला ॥ चाल ॥ पाहिन कशि नच अंगिकारिशिल तूं आतां त्याला ॥ या भूपतिवर कोण गाजविल निजाधिकाराला ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—हायहाय बाबा ! आपलं माझ्यावर प्राणापलिकडे प्रेम असतां एका क्षणांत मी आपणांस नकोशी झालें कां ? असा अपला अपराध तरी मी काय केला ? मला वाटतें खचित कोणी कांहीं तरी करणी करून माझ्या विषयीं आपलं मन पालटदिलं आहे.

**राजा**—( दयेनें ) छे, छे, मनमोहिनी, असं मनांत देखील आणूं नकोस. तुझ्या पूर्ण कल्याणासाठींच मी तुला त्याला देण्याचा बेत केला आहे तर—

**पद.** चाल. काय मला भूल.

**आज्ञा ही पूर्ण सुते माझि पाळुनी ॥ वरि जो मी ठेवियला पती योजुनी॥धृ.॥वच माझें जरि या वरि हें न मोडिसी ॥ पूर्वीहुनि प्रिय मजला अधिक वाटसी ॥ त्यायोगें भूषण मग येइलाचि मसी ॥ मानीं नच यामधिं मुळिं दुःख निज मनीं ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—नका नका ! बाबा, प्रत्यक्ष आपल्या हातांनीं अशा आगींत मला लोटूं नका. खाचित आज आपणांस मी मर्यादा सोडून बोलते आहे असें वाटत असेल पण पुढें या कृत्याचाच आपणांस पश्चाताप होईल.

**राजा**—( रागानें ) गप बैस पोरटे, मलाच उलट शहाणपण शिकवतेंस काय ? कांहीं चिंता नाहीं.

## दिंडी.

**किती जरि तूं केलीस विनवणी ती॥फल न कांहीं येईल तरी हातीं ॥ पती जो मी तुज असे योजि-**

**येला ॥ फिरविला नच जाईल विधात्याला ॥ १ ॥**

आणखी, तुला सांगतों या गोष्टींचा पूर्ण विचार कर. माझें ऐकलेंस तर सर्व राज्य तुझें आहे. नाहींतर मग तुझ्या दुःखाला सीमा नाहीं--

## साकी.

**हाकुनि तुजला निजसद्नांतुनि देतों बघ या काळीं ॥ भिक्षा मागत दारोदारीं फिराशिल मग त्या वेळीं ॥ वद्लों मी याची ॥ अठवण होइल तुजसाची ॥ १ ॥**

( त्राटिकेस ) चल, प्रिये-- ( दोघे जातात )

**मनमोहिनी**--हाय हाय ! हे माते वसुंधरे, तुला तरी माझी करुणा येऊं दे. (राणीच्या गळयाला मिठी मारून) आई-

पद. चाल. जाते कीं मम.

**अभागिनी ही कशास झाली कन्या तरि तुजला ॥**
**भरती ईनें आणिली आणाखि या तव दुःखाला ॥**
**याहुनि नसते झालें मुळि कीं जन्मतांचि जाते ॥**
**तरिदिन ऐसें तुज बघण्याचें दैवीं नच येतें ॥ १ ॥**

( पडदा पडतो ).

## प्रवेश ३ रा.—राजवाड्यामागील बाग.

**राक्षस**—काय करावे ? त्या सुंदरी मनमोहिनीनें माझें मन मोहित केल्यापासून मला कसलें तें समाधान ह्मणून नाहीं. भोजन करितांना शयन करितांना तिची ती मोहक मूर्ती सारखी डोळ्यासमोर दिसत असते. कोणत्याही कार्यांत लक्ष ह्मणन लागत नाहीं. फार काय ती मिळाल्यास आतां माझी धडगत आहे, नाहींपेक्षां काय होईल हें कळत नाही. असो. भगिनीला सुचवल्याप्रमाणें तिनें चित्रांगद राजाचें मन वळवून हें कार्य कोठपर्यंत जुळवून आणलें आहे तें पहावें. जमलें असलें तर ठीकच. नाहींपेक्षां मी तिचे बलात्कारानें हरण करून आपला मनोरथ पूर्ण करणार. बहुतकरून चित्रांगद राजा मी मागणी घातली असतां आपली मुलगी दुसऱ्याला देऊन मजसीं कधीं वैर जोडणार नाहीं. मग पाहावें काय होतें तें ? बरें. मी आल्याचा भगिनीला निरोप पाठवला असतां ती कां बरे येत नाहीं ? (समोर पाहून) ही पाहा आलीच.

( त्राटिका प्रवेश करिते. )

**त्राटिका**—काय चमत्कार झाला पहा. परवांपर्यंत मी महाराजाचें मन वळवून ते मनमोहिनीला माझ्या भावासच दे-

तील अशी माझी खात्री होऊन चुकली होती. पण काल आपलं एकाएकीं सारं विपरीत झालं.—

पद. चाल. दासि ऐसे किंवा स्वमनीं वा.

**भूपतिनें मनमोहिनि योजियली देण्याला ॥ ममबंधुस ऐकुनि हें दुःख होय सचिवाला ॥ एकांतीं गांठुनि मग करुनी उपदेशाला ॥ वाटविले करितों त्या अन्यायाचरणाला ॥ सांगितलें तिस देण्या कोणा नृपतनयाला ॥ यायोगें सर्व बेत माझा कीं ढासळला ॥ १ ॥**

तर आतां त्या दुष्ट प्रधानाचीं बोटें त्याच्याच डोळ्यांत जाण्याला काय बरें युक्ती करावी ? ( विचार करून ) हं असेंच करावें. त्यांचा तो विचार अमलांत येण्यापूर्वीच मनमोहिनीला माझ्या भावाकडून पळवून दूर न्यावी. मग कसलीच भीती नाहीं.

**राक्षस**—भगिनी, मी येथें केव्हांची तुझी वाट पहात आहे पण तूं मजकडे न पहातां आपल्याशींच कसला विचार करतेंस? बरें माझ्या कार्याचें कसें काय ? कोठपर्यंत जुळत आलें?

**त्राटिका**—अरे, काय सांगूं. तूं खचित दुर्दैवी आहेस. कार्य अगदीं जुळत आलेलें शेवटी मोडल्यासारखे झाले.

**राक्षस**—ह्मणजे काय ? झालें काय.

**त्राटिका**—काय झालें म्हणून काय विचारतोस ? तुला वरण्याविषयीं मनमोहिनी नाखुष असतां व या कार्यास तिची आई प्रतिकूल असतां मी महाराजांचं मन वळवून ती तुला देण्याचाच त्यांचा विचार कायम केला होता. पण तो मेला दुष्ट प्रधान सुमती आहेना ? त्यानें आपलें पांडित्य जाळून काल तो त्यांचा विचार फिरवला.

**राक्षस**—अरे, दुष्टा, सचिवा तुझे तुकडे तुकडे करतो.

**त्राटिका**—अरे. त्याचा चांगला सूड आतां तूं घेच. पण आगोदर मनमोहिनीची प्राप्ती करून घेण्यासाठीं मी तुला सांगतें तसें कर.

**राक्षस**—भगिनी, कसें करूं म्हणतेंस ?

**त्राटिका**—ऐक—

पद. चाल. पदार्थ अमलीही.

**जलमंदिरिं ती एकटि असतां बळेंचि तूं तिजला॥ हरुनी नेई सदनाला ॥ धृ० ॥ आशा अथवा भय दाखवुनी ॥ घेईं मग तन्मन वळवोनी ॥ वश होतां ती नच मग कोणी ॥ अवमानिल तुजला ॥ कधिंही देउनि दुसऱ्याला ॥ १ ॥**

आणखी, मग तसाच जर कांहीं विपरीत प्रसंग आला तर त्याचें निवारण करण्यास तूं समर्थ आहेसच.

**राक्षस**---यांत काय संशय ? तूं माझी भगिनी आहेस ह्मणून आजपर्यंत या राजाची मी उपेक्षा केली नाहींपेक्षां याला कधींच कारागृहांत टाकून मनमोहिनीसुद्धां सर्व राज्य मी स्वाधीन करून घेऊन बसलों असतों.

**त्राटिका**--तसंच कर बरें मी आतां जातें. पण हेपहा अगोदर सांगितल्याप्रमाणें मनमोहिनीचें हरण करून मग दुसऱ्या कार्याला लाग. ( जाते. )

**राक्षस**---ठीकआहे. एकूण राजानें माझा असा अपमान केला काय ? कांहीं चिंता नाहीं. त्याचा चांगला सूड घेतों. ब्रह्मदेवाच्या वरानें अमर झालेल्या व सर्व रासक्षी माया माहीत असलेल्या या भयानकास त्यासह या विदर्भनगरीचा नाश करण्यास किती वेळ लागणार ? असो. आतां अगोदर भगिनीनें सुचविल्याप्रमाणें मायेचें रूप घेऊन मनमोहिनीच्या जलमंदिरांत बसावें व प्रसंग पाहून तिला हरण करून न्यावें.

( असें ह्मणून जातो. )

## अंक तिसरा समाप्त.

---

# अंक चवथा.

## प्रवेश १ ला. स्थल. आकाशमार्ग.

( तदनंतर विमानस्थ चूडामणी प्र. क. )

**चूडामणी**—( दुःखानें ) शिवशिव. परमेश्वरा, आतां माझ्या या प्रवासाचा शेवट व्हावा तरी कधीं?—

पद. चाल. वैभवमाझें.

**मध्यमलोकांतिल या सारीं लहान मोठीं तीं नगरें ॥ धुंडियलीं तशि रम्य स्थानें घोरवनेंही गिरिशिखरें ॥ १ ॥परि तातांचा जननीचा वा माझ्या प्रियकर मित्राचा ॥ कोठेंही मज शोध कसा तो अजुनी लागे नच साचा ॥ २ ॥ यक्षेंद्राचा दुःखभार कीं होइल हलका मजकडुनी ॥ अशी आशा जी मन्मनिं होती गेली सांप्रत मावळुनी ॥ ३ ॥**

काय करावें? माझ्या अंतःकरणाची यावेळीं फारच च-

मत्कारिक स्थिति होऊन राहिली आहे. एकीकडे महाराजांच्या आज्ञेप्रमाणें स्वकीय जनांचा शोध करण्याची इच्छा व दुसरीकडे त्या सुंदरीला पाहण्याविषयीं लागलेली उत्कंठा. कारण.—

## साकी.

**विनयवती किती मधुरालापा आहे नृपतनया ती स्वप्राणाहुनि अधिकचि मजवरि ठेवितसे कीं प्रीती ॥ कमलिनि अपुणाला ॥ मधुकर मानितसे मजला ॥ १ ॥**

त्यासाठीं एक महिन्यानें तुला भेटेन असें तिला कबूल केल्याप्रमाणें सांप्रत तिचें दर्शन घेण्याविषयीं माझें मन फार उतावळें झालें आहे. असो. आज मी फारच लांब प्रवासकेला असल्यामुळें मला अतिश्रम झाले आहेत तर या विंध्याद्री पर्वताच्या शिखरावर घटकाभर विश्रांति घ्यावी. ( पर्वतावर उतरून ) अहाहा! अशा रात्रीच्या वेळीं भूलोकावरून आकाशाची किती तरी मौज दिसत आहे——

पद. राग मालकंस.

**रजनीपति हा शशि उदयाला ॥ येउनि शोभवि बहु गगनाला ॥ ध्रु. ॥ दिव्य रत्नहारासम कैसें ॥**

**तारामंडल सभोंवति दिसे ॥ पसरुनि त्याचे विमल कर तसे ॥ दूर पळविती घन तिमिराला ॥ १ ॥**

( पडद्यांत ) ' अहो, धांवाहो धांवा; कोणी तरी या दुष्टापासून मला सोडवा. '

**चूडामणी**—( ऐकून ) अरे, हा काय चमत्कार—

## दिंडी.

**घोररात्रीं या निर्मनुष्य ठायीं ॥ दीन करुणारव ऐकु कसा येई ॥ गमे परिचित भय मनीं उभे राहे ॥ काय दुःखाचा तरि प्रसंग आहे ॥ १ ॥**

काय बरें हा प्रकार असेल ( पाहून ) अरे, हा कोणी महा भयंकर राक्षस शृंगाररसाची मूर्तिमंत देवताच अशा एका सुंदर स्त्रीला हरण करून आकाशमार्गानें या पर्वतावरच येत आहे, व ती मोठ्यानें विलाप करित आहे ? हा राक्षस व ही सुंदरी कोण बरे ? पण त्या विषयीं विचार कशाला ? तो राक्षस तिजसह येथेंच आला—

( तदनंतर मनमोहिनीसह भयानक राक्षस प्र. क. )

**मनमोहिनी**—( दुःखानें )

पद. चाल. उभिजवळ ही.

**हायहाय दुर्दैवानें आज वेळ कशि साधियली ॥**
**एकाकी या दुष्टाच्या हातीं ही अबला पडली ॥**
**प्राणप्रिय चूडामणिच्या दर्शनासही अंतरली ॥**
**चाल ॥ दया नसे मुळिं जनकाला ॥ निजकन्येला ॥**
**निशाचराला ॥ अर्पण कशि त्यानें केली ॥ १ ॥**

**चूडामणी**--( ओळखून ) अरे, हें काय आश्चर्य ! मी जागृत आहे कां स्वप्न पहात आहे.

पद. चाल. ममजीवाची प्रियकरणी.

**प्राणसखी मनमोहिनि ती ॥ पाहतसे मी निशाच-**
**राच्या सांप्रत पडलेली कशि हातीं ॥ धृ० ॥**
**व्याघ्राच्या मुखिं कोमल हरिणी त्यापरि सुंदरि**
**मजला दिसती ॥ १ ॥ कारण याचें काय नच**
**कळे गेली होउनिया गुंगमती ॥ २ ॥**

पण हा राक्षस कोण असावा ! ( नीटपाहून ) समजलों. आपला केवळ प्राणच असा बाण ज्यानें पर्वतावर पुरला होता तोच हा महामाय राक्षसाचा पुत्र भयानक ! आतां या दुष्टानें

इला कां हरण केली हेंही माझ्या लक्षांत आलें. असो. माझ्या प्राणदयितेच्या अशा संकटकाळीं मी येथें आहे ही परमेश्वराची मजवर मोठीच कृपा झाली. आतां पहातो हा दुष्ट कसा तिला स्पर्श करितो तें.

**राक्षस**—सुंदरी, मनमोहिनी, या अरण्यांत तूं कितीजरी आक्रोश केलास तरी तुला मजपासून सोडविण्यास कोणी देखील येणार नाहीं. मग आतां विनाकारण हट्ट कां बरें करतेस. आपल्या पित्याच्या आणि मातेच्या आज्ञेप्रमाणें माझा अंगिकार कर ह्मणजे तुला कसलेंही दुःख किंवा भय रहाणार नाहीं.

**चूडामणी**—( स्वगत ) काय ? या राक्षसाचा मनमोहिनीनें अंगिकार करावा अशी तिच्या मातापितरांचीही इच्छा आहे.

**राक्षस**—प्राणसखे, आतां विचार कसला करतेस. लौकर माझा मनोरथ सफल कर. हें पहा. एकदां तूं माझा अंगिकार केलास ह्मणजे तुला कांहीं कमी नाहीं. त्रैलोक्यांतील कोणतीही वस्तु मागितलीस तरी तुला हा भयानक आणून देईल व तुला देवी समजून निरंतर तुझी सेवा करण्यांत तत्पर राहील. तर प्रिये, आपल्या खुषीनें मदनाच्या ता-

पानें तप्तझालेल्या या माझ्या शरिरास लौकर आलिंगन देऊन शांत कर. ( तिला धरावयास जातो. )

**मनमोहिनी**—( रागानें )

पद. चाल. अधमा पशुसम किंवा गुरुदत्त.

**होई दूर दूर नीचा ॥ बसली कां न तुझी वाचा ॥ धृ ॥ व्यर्थ कशाला मत्प्राप्तीची स्वमनीं इच्छा धरुनी ॥ दुर्भाषण हें करिसी लज्जा कशि नच तुजलागोनी ॥ १ ॥ कधिंही कौमुदि सोडुनि चंद्रा आदरि नच राहुते ॥ शिवशिल तरि तुज समोर देइन खचितचि स्वप्राणातें. ॥ २ ॥**

**राक्षस**—अशा मिथ्या कांगावाला मी मुळींच भिणारा नव्हें समजलीस. लौकर माझ्या मनोदयाप्रमाणें वागण्यास कबूल हो; नाहींतर बघ तुजवर बलात्कार करून मी आपली इच्छा पूर्ण करितों.

**मनमोहिनी**—( दुःखानें ) हायहाय ! परमेश्वरा, हा राक्षसाधम माझी विटंबना करीत असतां तूं डोळे मिटून कसा बसलास.—-

पद. चाल. वाडवडिलां किंवा सांगूं मी किती.

दैवाचा हा मजवरि घाला ॥ पडुनी मुकलें सर्वस्वाला ॥ ध्रु. ॥ आकाशांतिल ग्रह हो मजला ॥ धांवा आतां सोडविण्याला ॥ १ ॥ प्रियनाथा तुह्मि कोठें रमलां ॥ अवचित शेवट हा मम झाला ॥ नच पुरतेंही त्वन्मुख कमला ॥ बघुनी जनु हा कृतार्थ केला ॥ २ ॥

**चूडामणी**—( एकदम पुढें होऊन ) प्रिये, भिऊंनको, भिऊनको. ( राक्षसास ) दुष्टा, सोड तिला.

**मनमोहिनी**—प्राणप्रिय चूडामणी माझें रक्षण करो.

**चूडामणी**—प्रिये,—

## साकी.

प्राणहुनिही प्रिय तुज मानी तो हा चूडामणि गे ॥ सदैवयोगें रक्षणार्थ तव आहे तुझिया मागें ॥ लवही मनिं साचें ॥ भय न धरी या दुष्टाचें ॥ १ ॥

**मनमोहिनी**—महाराज, यावेळीं आपण इकडे कसे आला ?

**चूडामणी**—सुंदरी, तुझा निरोप घेऊन स्वजनांचा शोध

करण्याकरितां गेलों तों आज एक मासपर्यंत निरर्थक हिंडून सांप्रत तुझ्या मंदिराकडे यावयास या मार्गानें चाललों असतां अवचित तुजवर हा दुःखाचा आलेला प्रसंग पाहिला.

**मनमोहिनी**—हायहाय ! दैवानें मजसाठीं तुह्मांलाही दुःखांत घातलें.

**चूडामणी**—पण सुंदरी, या दुष्टाच्या हातीं तूं कशी सापडलीस ?

**मनमोहिनी**—ऐकावें महाराज, या राक्षसाची बहिण माझी सावत्र माता आहे तिजकडून यानें माझ्या पित्याजवळ मला मागणी घातली असतां मी अनुकूल झालें नाहीं ह्मणून आज रात्रीं गच्चीवर मी आपली मार्गप्रतिक्षा करित बसलें असतां या दुष्टानें अवचित तेथून मला हरण करून येथें आणली.

**चूडामणी**—प्रिये, आतां सर्व प्रकार मला कळला. असो—

**दप.** चाल. या विरहा कां भीसी.

**नधरी मनिं भीतीतें ॥ सखये ॥ धृ. ॥ या दुःखांतुनि तुज सोडविणें कार्य असें माझें तें ॥ १ ॥ तुज समक्ष मी या दुष्टाच्या बघ हरितों**

284488

**प्राणाते ॥ २ ॥ तिमिराचा लय करण्या रविला काय कठिण गे पडतें ॥ ३ ॥**

**राक्षस**—अरे, शरभापासून हरिणीची मुक्तता करण्याकरितां जसा हरिण घेऊन आपल्याच प्राणास मुकतो तद्वत् या सुंदरीला स्त्री करण्या करितां मी येथें घेऊन आलों असतां तूं एकाएकीं कोणरे अधम येथें प्राप्त झालास ? अरे, सर्व मानव ज्याला थरथर कांपतात त्याच्याशीं या सुंदरीच्या अभिलाषानें तूं कलह करण्याची इच्छा करतोस काय ? तर याबद्दल तुला आतांच शासन करितों.

**मनमोहिनी**—प्राणनाथ हा मोठा दुष्ट आहे यासाठीं या हतभागिनीकरितां आपण अशा प्राणसंकटांत पडूं नका.

**चूडामणी**--प्रिये, अशी घाबरलीस कां जरा धैर्य धरून पुढला चमत्कार तर पहा. ( राक्षसास ) अरे, अधमा, व्यर्थ बडबड कशाला करतोस ? काय तुझा पराक्रम आहे तो दाखीव.

( दोघे लढतात राक्षस पराभूत होतो )

**चूडामणी**—अरे दुष्टा, आपल्या पापीं हस्तांनीं या सुंदरीला येथें आणून तिला मुखानें दुर्भाषणें बोललास याबद्दल योग्य शासन ह्मणून तुझा प्राणच घेतो पहा.

**राक्षस**—अरे, ही गोष्ट तर कल्पांतीं मनांत आणूं नकोंस. ब्रह्मदेवापाशीं तपश्चर्या करून अमरत्व संपादन केलेल्या मला त्रैलोक्यांत देखील कोणापासून भय नाहीं. ( मनांत ) हें प्रकरण जरा जड दिसतें तर आतां मायेच्याच योगानें याचा नाश केला पाहिजे; ( उघड ) अरे, वृथा बाहुबलगर्व वाहणाऱ्या आतां माझ्या तडाक्यांतून तूं आपलें रक्षण कसें करशील ? ( एकदम उडून आकाशांत जातो, )

**चूडामणी**—अरे, हा राक्षस एकाएकी नाहींसा कसा झाला आणि हें काय आश्चर्य !

पद. चाल. टाकिन गरुडासही

**अवचित यां गगनामधुनी ॥ प्रस्तर गिरापरि मोठे मजवरि पडती येवोनी ॥ धृ ॥ चहूंकडे तममय दिसतें ॥ पुनरपि तेजोमय होतें ॥ शस्त्रेंही वर्षति वरुनी ॥ काय करूं मी या कालीं हें नच मज ये कळुनी ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—हाय हाय ! आतां प्राणनाथ आपली दशा काय होणार ?

पद. चाल: जो मम नयन किंवा अंजनीगीत

लोकरि इंद्रादिक अमरानो ॥ त्या परि पंच महा-
भूतानो ॥ तुह्मि धावुनि दिग्पालानो ॥ रक्षा
प्रियनाथा ॥ १ ॥

हायहाय ! हे चांडाळणी मनमोहिनी—

आपण भोगुनिया दुःखाते ॥ लाविशि भोगाया
दुसऱ्याते ॥ तुजमुळेंचि या यक्षवराते ॥ प्रसंग
हा आला ॥ २ ॥

आणखी, पापिणी, हा प्रकार आपल्या डोळ्यांनीं पहातेस इतकी तूं कठोरहृदया कशी झालीस—( मूर्च्छीत पडते )

**चूडामणी**—समजलों, त्या राक्षसाधमाने माझा नाश करण्या करितां ही राक्षसी भयंकर माया निर्माण केली आहे तर आतां याशीं युद्ध करण्यांत अर्थ नाहीं. याचें प्राण घेण्याचें साधन सुदैवानें आपणा जवळ आहे त्याचाच आतां प्रयोग करावा. ( उघड ) अरे, पाप्या, माझा नाश करण्याचा तुझा प्रयत्न व्यर्थ आहे पहा—

## साकी.

प्राणरूप तव दिव्य बाण जो विधिनें तुजला

**दिधला ॥ तो दुर्दैवें सांप्रत वध या आहे मम करिं आला ॥ कोणी नच आतां ॥ त्या पासुनि तुज सोडविता ॥ १ ॥**

( असें ह्मणून धनुष्यास बाण लावतो )

**राक्षस**—( पडद्यांतून पाहून ) अरे अरे ! घात झाला ! ज्या पासून माझा प्राणनाश होणार तो हा बाण याच्या हातीं कसा आला ! ( चूडामणीस ) अरे, तो बाण मजजवळ देशील तर तुला आपला मित्र समजून त्याबद्दल त्रैलोक्यांतील कोणतीही प्रिय वस्तु मागितलीस तरी आणून देतों

**चूडामणी**—अरे, मूर्खा, इतका मी वेडा आहे असें कां तुला वाटलें ? तुझ्यासारख्या दुष्टांचा नाश करण्यावांचून मला दुसरें कांहीं प्रिय नाहीं. ( असें ह्मणून बाण सोडतो )

( पडद्यांत ) **राक्षस**—हायहाय ! हे माझे प्रियभगिनी, बाबा, या मनमोहिनीच्या पायीं व्यर्थ मी आपला नाश करून घेतला ! आतां हा बाण माझ्या शरीरांत शिरून माझे हाल करून मला मारणार. ( पडद्यांत धाडकन पडल्याचा आवाज होतो. )

**चूडामणी**—अहाहा ! सुंदरी, मनमोहिनी—

पद. चाल—वाटे सर्वथा.

गेला यमपुरीं शत्रु तव गे ॥ ध्रु० ॥ प्रलयकाला-परी देहपातें पहा ॥ किति भयंकर तरी जाण करि शब्द हा ॥ ऐकिला यापरी कधिं न मागें ॥ ॥ १ ॥ गाढ आलिंगना देइ मज सुंदरी ॥ प्रेम आणुनी मनीं धांवुनी झडकरी ॥ वीज मेघा जशीं तेवि वेगें ॥ १ ॥

[ पाहून ] अरे, ही अशी निश्चेष्ट पडली हें काय ? समजलों. त्या राक्षसानें निर्मिलेली माया पाहून भीतीनें इला मूर्छा आली. तर आतां लौकर हिला हिच्या महालांत नेऊन नेत्रांना पाणी लावून सावध करावें. मग काय ?

दिंडी

ऐकुनीया प्रिय वर्तमान हेंची । फार होइल मनिं मुदित सखी साची ॥ प्रेम योगें आलिंगनास देता मला कितितरी हर्ष तो होय चित्ता ॥ १ ॥

( पडदा पडतो )

---

## प्रवेश दुसरा. मनमोहिनीचा महाल.

( चूडामणी व मनमोहिनी बसलीं आहेत दासी उभी आहे )

**चूडामणी**—अहाहा ! प्राणसखे मनमोहिनी—

**पद.** चाल. सांगु मी किती किंवा. हिमधवलांगी.

**गांधर्वाच्या विधिनें तुजशीं आज सखे मी विवाह केला ॥ त्या योगानें सांगूं किति तरि हर्षचि अंतरिं आहे झाला ॥ धृ० ॥ लक्ष्मी जैसी श्रीविष्णूला ॥ किंवा इंद्राणी इंद्राला ॥ पार्वति शोभवि भूतेशाला ॥ तैसी भूषविसी तूं मजला ॥ १ ॥**

( मनांत ) आतां अशा आनंदाच्या वेळीं प्रियेची कांहीं तरी करमणूक केली पाहिजे. ( उघड ) प्रिये, या गच्चीवरून या आकाशाची शोभा पाहून मला असें वाटतें—

**पद.** रागमालकंस.

**नभ नच तरि हा सागर भासे ॥ तारांगण हा वरि फेंस दिसे ॥ धृ. ॥ विधुनच तरि गे नौका त्यांतुनि ॥ चाले ऐसे येई मन्मनिं ॥ कलंक त्याचा तो न असे परि ॥ शीड तिचे कीं बहु शोभतसे ॥ १ ॥**

आणखी प्रिये, दुसरी अशीही कल्पना मनांत येते कीं—

## दिंडी.

**फार दिवसांनीं गृहां चंद्र आला ॥ हर्ष होतां मग पूर्वदिशा खीला ॥ गगन ताटामधिं भरुनि ऋक्षरत्नें । पहा त्यावरि ओवाळिते प्रयत्नें ॥ १ ॥**

तसीच प्रिये, यावेळीं या भूतलावर तरी काय विलक्षण मौज दिसते आहे—

**पद.** चाल जेव्हां जेव्हां वाढायाते.

**नानापरिच्या सर्व लता या ॥ गेल्या कुसुमांनीं शोभुनिया ॥ मंद मंद मारुत वाहुनिया ॥ किति सुखवीतो अपुणासी ॥ १ ॥ कोकिल आम्रासव पिउनीया ॥ गायन करिती बघ समयीं या ॥ वसंत ऋतुची पडता छाया ॥ रमणिय झालें चोंहिकडे ॥ २ ॥**

प्रिये, अशा आनंदकारक वेळीं तूं आपल्या चतुरतेने कांहीं अलंकार करावयाचा तें सोडून असें मौन कां बरें धारण करतेंस ? बरें तें राहूं दे; तुजबरोबर विवाह लावल्यापासून मज

**यायोगें यक्षराज जाइल मजवरि कोपोनी ॥ तशांत आणखि मानवकन्या वरुनी आलों हें पाहोनी ॥ काय गती मम करिलचि मग तो हें नच सांप्रत ये मज कळुनी ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—वाहवा ! हें सर्व मला कळतं. कांहींतरी भय घालून मला तिकडे न नेण्याचा आपला विचार आहे झालं. पण आतां मी आपणांस सोडून एक घटकाभर देखील रहाणार नाहीं.

**चूडामणी**—प्रिये, तूं म्हणतेस त्याप्रमाणें मला तरी कोठें तुला सोडवतें आहे पण—

**साकी.**

**आग्रह न धरी अलकावातिमधिं मजसह तूं ये-ण्याचा ॥ तेथें गेल्यावरि सुखकारक परिणा[illegible] न दोघांचा ॥ तेथुनि येवोनी ॥ राहिन तु[illegible] सह या सदनीं ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—फार चांगली युक्ती ही. मजसाठीं आप[illegible] तेथून येथें येणार ? आणि मी तेथें आलें तर आपली नगरी अपवित्र होईलना ?

**चूडामणी**—आतां या इच्च्या इट्टाला काय बरं उपाय करावा ? ( उघड ) तसें नाहीं प्रिये, पण अतांच तेथें कशाला येतेस ? मागाहून तुला नेलें तर नाहींका चालणार ?

**मनमोहिनी**—प्राणनाथ, मी आपली आज्ञा उल्लंघन करीन असें आपणांस वाटतें कां ? पण काय करूं ?

पद. चाल. जाई परतोनी.

**यावरि नच सुगती ॥ माझी ॥ जरि राहियले येथें मी तरि ॥ धृ. ॥ कन्येविषयीं या मुळिं आतां ॥ मानिं जनकाच्या नसेची ममता ॥ तशांत राक्षसवध त्या कळतां ॥ विटंबना मम करिल अती ॥ १ ॥**

यासाटीं जर आपणांस मला येथें एकटी टाकूनच जायाचें असेल तर अगोदर आपल्या हातांनींच माझी काय वाट लावणें ती लावावी. यावर येथें राहून मला माझी कांहीं धडगत दिसत नाहीं.

**चूडामणी**– ( मनांत ) आतां कसें करावें ? हिचें ह्मणणें ही खरें आहे. पण मी जर हिला बरोबर नेली तर यक्षपतीचा मजवर कोप होऊन कदाचित् भयंकर शाप देखील

देतील. बरें न नेली तर माझ्या पश्चात् येथें हिला कोण सांभाळणार ? अथवा, इला बरोबर न्यावीच. मग पुढें काय होईल तें होवो--

## साकी.

**या मनमोहिनि वांचुनि प्रिय नच या भुवनीं मज कोणी ॥ तत्सुखार्थ मी निजसौख्यावरि सोडियलें कीं पाणी ॥ ठेवुनि इस तेथें ॥ जाइन मग निज कार्यातें ॥ १ ॥**

( उघड ) ठीक आहे. प्रिये, तर मग चल आतांच आपण अलकावतींत जाऊं.

**मनमोहिनी**--माझ्याकडून मुळींच उशीर नाहीं.

**दासी**--ताईसाहेब, आपण जातां पण माझी काय वाट ?

**मनमोहिनी**--सखे, या मृत्युलोकीं माझ्या खऱ्या कळवळ्याची एक माझी आई व दुसरी तूंच आहेस. तर आतां--

पद. चाल. नवनितसम किंवा दवडु नका.

**पतिसह मी जरि जातें सोडुनी तुला ॥ तरि नच कधीं जाईंगे विसरुनी मला ॥ धृ० ॥ बालपणीं**

**पासुनि जें प्रेम अंतरीं ॥ ठेविलेंस मजविषयीं ठेवयावरी ॥ खचित भेट देइन तुज मी कधीं तरी ॥ अधिक न मुळि बोलवते कंठ दाटला ॥ १ ॥**

आणखीं हे माझे सर्व अलंकार आतां तुला मी बक्षिस देतें. यापुढें दासीपणाचें काम न करितां आपलें लग्न करून घेऊन आनंदानें रहा.

**दासी**--पण ताईसाहेब, आपण एकाएकीं गेला हें ऐकून सरकार माझी काय दशा करतील ?

**मनमोहिनी**—ही शंका माझ्या लक्षांत पूर्वींच आली आहे व त्याचीही मी तजवीज केली आहे. ( एक पत्र काढून ) हें पत्र तूं बाबानां दे. ह्मणजे त्यानां सर्व हकीगत कळून ते तुला कांहीं बोलणार नाहींत. आणखी माझ्या आईचें तूं समाधान कर.

**चूडामणी**—प्रिये, तुझी केवढी तरी धूर्तता ! आजच निघण्याचा पुरा निश्चय करून अगोदर पत्र देखील लिहून ठेवलें होतेंसनां ? बरं चला आतां ( विमानांत बसतांना दचकून ) अरे हें काय ?

## साकी.

वामनेत्र हा एकाएकीं बघ माझा लवुं लागे ॥ सु-
गती यावरि न दिसे होतें शंकित मानस बहु गे ॥
भार सर्व अमुचा ॥ तुजवरि जगदीशा साचा ॥ १

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ३ रा. राजवाडा.

( आसनस्थ, चित्रांगद राजा व सुमती प्रधान प्र. क. )

**राजा**—प्रधानजी, तुमचें ज्ञान किती वर्णावें ? आपण उपदेश केल्यामुळें स्त्रीलंपट होऊन माझ्या हातून स्वतःच्या प्रियकन्येला आजन्म दुःखांत लोटावयाचें जें भयंकर पातक होत होतें त्यांतून मी मुक्त झाला.

**प्रधान**—बरें पण आतां आपला काय विचार झाला आहे ? आज्ञा होईल तर मनमोहिनीची तजबीर घेऊन तिला अनुरूप असा वर शोधण्याकरितां जातों.

**राजा**—आपण सांगतां तो मार्ग उत्तमच आहे पण माझा विचार याहून निराळा झाला आहे.

**प्रधान**—तो कोणता बरें ?

**राजा**—ऐका—

**पद.** चाल. नको हरिनिशी किंवा त्रैलोक्याधिप.

**शिवधनु भंगिल त्याला अपुली कन्या जानकि देण्याला ॥ जनकानें पण करितां मिळला रघुनायक तो पति तिजला ॥ मीनयंत्र भेदिताचि तनया द्रुपदें दिधली पार्थाला ॥ त्यापरि आपण लावूं कांहीं पण मनमोहिनि वरण्याला ॥ १ ॥**

**प्रधान**—ठीक आहे. हाही विचार कांहीं वावगा नाहीं- मग त्याप्रमाणें कोणता पण लावावयाचा हें लौकरच ठरवावें. ह्मणजे तो मी सर्व भूमंडळावर जाहीर करीन.

( एक दुःखित झालेला सेवक प्र. क. )

**सेवक**—राजाधिराजांचा विजय असो. महाराजांस फार दुःखाची बातमी सांगावयाचें माझ्या नशीबीं आलें आहे.

**प्रधान**—काय दुःखाची बातमी ! ती कोणती ?

**सेवक**—आपल्या मनमोहिनी ताईसाहेब काल मध्यान्हरात्रीं एकाएकीं कोठें नाहींशा झाल्या.

**राजा**—काय ? मनमोहिनी नाहिंशीं झाली ? हाय हाय ! ( असें ह्मणून मूर्छित पडतो ).

**प्रधान**—महाराज, सावध व्हा; सर्व कांहीं पुरें वर्तमान कळल्या वांचून असें करूं नका.

**राजा**—( सावध होऊन ) प्रधानजी, मी सारें समजलों. हें कपट त्या त्राटिकेचें आहे. तिच्या भावास मनमोहिनी देण्याचा माझा निश्चय बदललेला पाहून तिनें तिला कोठें तरी नेऊन ठेविलें असावें.

**प्रधान**—माझ्या मनांत देखील हीच कल्पना येते.

**राजा**—अरे, सेवका, जा त्राटिकेला इकडे घेऊन ये.

**सेवक**—आज्ञा—( जातो व त्राटिकेसह प्र. क. )

**राजा**—प्रिये, हा काय प्रकार आरंभला आहेस ?

**त्राटिका**—काय झालें काय ?

**राजा**—मनमोहिनी कोठें आहे ?

**त्राटिका**—( मनांत ) मनमोहिनी नाहिंशी झाली यावरून कालरात्रींच माझ्या भावानें तिचें हरण केलें असावें असें वाटतें. तर आपण आतां अगदींच उडवाउडवी केली पाहिजे. ( उघड ) कोठें आहे ह्मणजे मला काय माहीत ?

पद. चाल. भूपती खरे ते.

मनमोहिनि ज्या दिनिं आज्ञा मम अवमानी ॥ बंधुस वरण्याच्या उपदेशा नच मानी ॥ त्या दिवसा पासुनि तन्मुखही बघण्याचें ॥ मी सोडुनि दिधलें निश्चयपूर्वक साचें ॥ चाल ॥ मग वर्तमान मज तीचें कोठुनी ॥ तें असेल माहित सांगा कोठुनी ॥ चाल ॥ तिजविषयीं माझा संशय हा घेवोनी ॥ वच वदतां वाटे नवलचि मोठें ह्मणुनी ॥ १ ॥

राजा—ते कांहीं नाहीं; अशा तुझ्या भाषणानें माझें मुळींच समाधान होणें नाहीं. मी तुला पुरें जाणतों—

## साकी.

तूंचि तिला नेउगि कोठें तरि असशिल गे लपविली ॥ विलंब मजला सांगाया जरि लावशील या कालीं ॥ धडगत नच मगती ॥ समजे पूर्ण तूझी चित्तीं ॥ १ ॥

त्राटिका—मी अशा पोकळ दबकावण्याला मुळींच भिणारी नाहीं समजलां. खबरदार पुरी चौकशी केल्याशिवाय माझें अशा भलभलत्या कृत्यांत नांव घेतलें तर.

**राजा**–प्रधानजी, आतां काय करावें तें तुह्मीच सांगा. मला तर हिचाच पूर्ण संशय आहे.

**प्रधान**–कांहीं चिंता नाहीं. आपण याची पुरी चौकशीच करून काय तें पाहूं? ( सेवकास ) अरे, मनमोहिनीच्या जवळच्या दासी पैकीं जी मालिनी तिला लौकर इकडे घेऊन ये.

**सेवक**–आज्ञा. ( जातो व मालिनीसह पुन: येतो. )

**प्रधान**—मालिनी, मनमोहिनी कोठें आहे?

**दासी**–महाराज, मला—

**प्रधान**–घाबरूं नकोस. नीट सांग व खरें सांग.

**दासी**—महाराजासमोर खोटें सांगून माझा निभाव कसा लागणार? सरकारांनीं हें पत्र पहावें. ( पत्र प्रधानाजवळ देते. )

**प्रधान**—( राजास ) सरकार, हें मनमोहिनीनें आपणांस पत्र दिलें आहे तर तें आपणच वाचावें.

**त्राटिका**—( मनांत ) काय? कार्टीनें पत्र दिलें आहे? तर मग माझ्या भावानें तिला नेलीशी वाटत नाहीं. मग मेली गेली तरी कोठें?

**राजा**— प्रधानजी, ऐका–( पत्र वाचतो ) परमपूज्य

पित्याचे चरणीं कन्या मनमोहिनीचा शिरसाष्टांग प्रणिपात. आपण आजपर्यंत मजवर प्रेम करून जें माझें लालन पालन केलें आहे त्याबद्दल आपले उपकार मी कांहीं केलें तरी फिटावयाचे नाहींत, परंतु माझ्या सावत्र मातेनें हल्लीं आपणांस अपल्या पूर्ण मुठींत ठेऊन माझ्या आईचा व माझा अतिशय छळ केला व तो आह्मी दोघींनीं निमूटपणें सहन केला. अलिकडे तिनें आपला भाऊ जो राक्षस त्याला वरण्याविषयीं माझी एकसारखी पाठ पुरवली व आपणही तिजप्रमाणेंच मला सांगूं लागला. तेव्हां मला तें न आवडून--

**पद.**— चाल. ऐशा व्यवहाराभिंत.

**सुदैवयोगें अलकावतींतिल यक्ष थोर कोणी ॥**
**मजला वरण्या मन्मंदिरिं तो आला चालोनी ॥**
**गांधर्वाच्या विधिनें त्याशीं विवाह मी केला ॥**
**विनती करितें अपराधाचि हा क्षमा करायाला ॥२॥**

आपला वियोग मला दुःसह होईल म्हणून मी येथेंच रहाणार होतें परंतु काल तिनें आपल्या भावाकडून मला एका घोर अरण्यांत नेऊन आपला हेतु पुरा करण्याचा विचार केला; पण सुदैवानें तेथें माझे प्राणपती येऊन त्यांनीं त्या दुष्टापासून

मला सोडविल्यामुळें मी वांचलें. नंतर येथें राहणें सुखावह नाहीं असें जाणून मी त्यांच्या बरोबर अलकावतीस गेलें. तर सर्व राग सोडून मजवर प्रेमाची वृद्धी व्हावी. शेवटीं इतकीच विनंती आहे कीं मालिनीनें आजपर्यंत माझी पूर्ण सेवा केली आहे यासाठीं तिला मी दिलेले अलंकार परत न घेतां तिची दासीपणांतून सुटका करावी.

**त्राटिका**—( मनांत ) अगबाई; मी शहाणी म्हणून मोठा गर्व मानीत होतें पण कार्टीनें माझ्यावर ताण केली. तिनें आपणास अगोदरच पती पाहून ठेवला होता. तरीच अशा उद्धटपणाच्या गोष्टी मला सांगत होती. बरें पण माझ्या भावाची काय वाट झाली असेल आणि आतां माझी तरी काय होईल ? माझ्या सर्व पातकाचें खचित आज मला फळ भोगावें लागणार !

**राजा**—हायहाय—

पद. चाल. मजवरि हें आलें.

**मजवरि रुसुनीयां ॥ एकाएकीं ॥ मजला सोडुनियां ॥ कोठें गेली मनमोहिनि ती आज्ञाधारक मात्प्रियतनया ॥ धृ० ॥ तिजवांचुनि**

**कांहीं ॥ या संसारीं ॥ सुख मजला नाहीं । आशा नज मुळिं आतां तेथुनि ती येण्याची मशिं भेटाया ॥ २ ॥**

( भूमीवर अंग टाकतो )

**प्रधान**---सरकार सावध व्हा सावध व्हा.

**राजा**--( उठून ) बाळे, काय केलेंस हें ? या तुझ्या पित्याला दुःखांत टाकून जाणें तुला बरें वाटलें नां ? अथवा याचा तुजकडे काय दोष--

## दिंडी.

**तुझा छल मी प्रियसुते फार केला ॥ राक्षसासी कथियलें वरायाला ॥ तदा पाहुनि अनुरूप असा कांत ॥ तया वरिशी हें होय जनिं पसंत ॥ १ ॥**

पण बाळे, तुजवाचून आतां माझी कशी गति होईल, ?

( इतक्यांत शोकाकुल झालेली सुशीला राणी येते )

**राणी**--हायहाय ? कोठें आहे ती माझी मनमोहिनी!

**राजा**--शिवशिव ? प्रिये--

पद. चाल. बाळा जोजोरे.

या जगिं पापी हा ॥ भूपति गे ॥ आहे किति तरि सांगे ॥ वश इस होउनिया ॥ अनुरागें ॥ छळ करि तव बहु रागें ॥ १ ॥ प्रियकर कन्येचा ॥ बघ तुजला ॥ वियोग मीं करविला ॥ कशि नच मुळिं-वाटे ॥ लाज मला ॥ मुख तुज दावायाला ॥ २ ॥

( असें म्हणून तिच्या पायां पडतो )

**राणी**—छेछे, महाराज, असें करून मला पापांत पाडूं नये जें कांहीं झालें तें माझ्या दुर्दैवानें झालें त्याचा आपणाकडे मुळींच दोष नाहीं. पण माझ्या बयेची काय वाट जाहली ?

**राजा**—प्रिये तिचें वर्तमान तुला काय सांगूं ? ती आपणांस पूर्ण अंतरली. आतां समाधान म्हणून इतकेंच मानायचें कीं—

## दिंडी.

थोर ऐसा कुणि यक्ष तिला कांत ॥ मिळुनि पडली गे पूर्ण ती सुखांत ॥ राक्षसीनें या जसें तुला छळिलें ॥ तसें तिजलाही फार दुःख दिधलें ॥ १ ॥

( रागानें ) अरेरे ! कायकरूं ? या चांडाळणीनें आपला पगडा मजवर बसवून आजपर्यंत माझ्या सुशील स्त्रीचा

व प्रियकन्येचा हवा तसा छळ केला त्याबद्दल मला जरी दया आली नाहीं तरी आतां तो सहन होत नाहीं. छे छे; त्याचें फल इला चांगलेंच मिळालें पाहिजे. ( त्राटिकेस उद्देशून प्रधानास ) प्रधानजी आतां बघतां काय—

## साकी.

**या पापिणिला निजकर्माचें पूर्णांचि फल भोगाया ॥**
**लौकरि टाका मम आज्ञेनें कारागृहिं नेउनिया ॥**
**कारण दुःखाचें ॥ वर्तन आहे कीं हीचे ॥ १ ॥**

**प्रधान**—आज्ञेप्रमाणें करितो. ( त्राटिकेस ) चला बाईसाहेब.

**त्राटिका**—( मनांत ) हायहाय ! आज काळ मजवर फिरला अं ! आजपर्यंत यांस मुठींत ठेवून मी वाटेल तें केलें पण त्यांची इतराजी होतांच आज मला कारागृहांत जाण्याचा प्रसंग यावा अं ! आतां माझ्या भावावांचून मला कोण सोडविणार ? पण त्याचेंही वर्तमान नीट कळत नाहीं. यावेळीं आपल्या सवतीचें पाय धरलें तर मी या प्रसंगांतून सुटेन; पण छे—

पद. चाल. प्रतिकुल होइल ही.

**आजवरी मी सत्तेनें छळ मानापरिचा ॥ करुनी जिस जनु तो केला नको नको साचा ॥ धृ. ॥**

**शरण दीन होउनि आतां तिजला जावोनी ॥ सोडवणुक करुनी घेऊं कां दुःखामधुनी ॥ प्राणांतीं नच मी ऐसी करिन कधीं करणी ॥ सर्व दुःख भोगिन झाला कोप जरी विधिचा ॥ १ ॥**

चला. माझी तयारी आहे. ( प्रधानासह जाते. )

**राजा**—( दासीस ) मालिनी. जा तूं आपल्या घरीं. मनमोहिनीनें सांगितल्याप्रमाणें तिचे सर्व अलंकार बक्षीस देऊन आजपासून तुला दासीपणांतून सोडविलें आहे.

**दासी**—सरकारांची आज्ञा—( जाते )

**राणी**—प्राणनाथ, खरेंच कांहो आतां आपली मनमोहिनी आपणांस भेटावयाची नाहीं? तिच्या शिवाय मी येथें कशी राहूं?

**राजा**—प्रिये, मी तरी कसें करूं? तुज प्रमाणेंच माझी स्थिति झाली आहे. तर याला कांहीं तरी उपाय केला पाहिजे. ( विचारकरून ) प्रिये, चल आतां आपण तीर्थयात्रा करण्या करितां जाऊं ह्मणजे त्या योगानें मनास कांहीं समाधान वाटलें तर वाटेल.

**राणी**—चला. आपल्या मर्जीबाहेर मी नाहीं.

( प्रधान प्र. क. )

**प्रधान**—सरकार आज्ञे प्रमाणें तिला कारागृहांत टाकली.

**राजा**–ठीक केलेत.आणखी, आतां हें राज्य तुह्मी संभाळा.

**प्रधान**–( आश्चर्यानें ) ह्मणजे,, काय सरकार.

**राजा**–कांहीं नाहीं. आतां मनमोहिनीवांचून येथें आह्मांला करमणार नाहीं या साठीं तीर्थयात्रा करण्यास आम्ही जातों.

**प्रधान**–छे छे, सरकार असा अविचार करूं नका. कांहीं काल हें कन्या वियोग दुःख धैर्यानें सहन करा ह्मणजे पुढें आपणांस बरें वाटेल ?

**राजा**—ह्मणूनच कांही कालतीर्थयात्रा करून काह्मी परत येतो तर तोंपर्यंत—

पद. चाल. पूर्वी अधरोष्ठावरी.

**राज्य सर्व हें तुमच्या करिं मी आहे या कालीं दिधलें ॥ प्रजा पुत्रवत् पाळुनि तुह्मी यश पाहींजे मेळविलें ॥ कळवित जा मज दूत पाठवुनि विशेष येथें जें घडलें ॥ उपदेश नका करूं आतां मुळिं विरक्त अमुचें मन झालें ॥**

पडदा पडतो.

**अंक चवथा समाप्त.**

# अंक पांचवा.

## प्रवेश १ ला—अलकावतीतिल शिवालय.

( मनोरमा व दासी सुलोचना प्र. क. )

**मनोरमा—**

**पद.** चाल–( नोहे नारीही )

**जयजय भूतेशा गिरिजारमणा ॥ अघनगसंहरणा ॥ ॥ मदनांतक शशिशेखर शंकर किन्नरसुरवरमुनिनुतरणा ॥ ध्रु० ॥ ईशा दिग्वसना भुजगाभरणा ॥ त्रिपुरासुरमथना ॥ मृत्युंजयहर जटामुकुटधर भवभयहरणा दीनोद्धरणा ॥ १ ॥**

सखे, सुलोचने, ही भगवान् पार्वतिप्राणवल्लभाची मूर्ती पाहिलीस कां मजकडे कशी सुप्रसन्न मुद्रेनें पहात आहे ती ?

**दासी**—खरंच बाईसाहेब, मला तर असं वाटतं कीं तुमच्या तपामुळें भगवान् प्रसन्न होऊन तुह्मांला वर मागण्याविषयीं आतांच ह्मणतील कीं काय ?

**मनोरमा**—तूं आपली कांहीं तरी बोलून माझें समाधान करतेंस झालं. भगवान् प्रसन्न होऊन मला वर माग असें ह्मणण्याइतकी माझी पुण्याई कोठें आहे ?

**दासी**—बाई साहेब, तुह्मी मजवर विश्वास ठेवा अगर नका ठेवूं. पण मी खचित सांगतें कीं, लौकरच तुमच्या मनाप्रमाणें भगवान् महेश्वर घडवून आणणार ?

**मनोरमा**—सुलोचने, खरंच कां ग, माझ्या मनाप्रमाणें घडून येईल—

**पद.** चाल. दासि ऐसे किंवा स्वमनीं वा नयनीं.

**प्रिय जननीजनकासी अठवण मम होउनिया ॥ पुनरपि ते येतिल कां लौकरि मज भेटाया ॥एकाकी प्राणनाथ गेले मशिं सोडुनिया ॥ फुटेल कां मजविषयीं द्रव कांहीं तत्हृदया ॥ पूर्वदिशा आनंदित होते शशि उगवुनिया ॥ होइन मी तशि कां गे तद्वदना पाहुनिया ॥ १ ॥**

**दासी**—बाईसाहेब, युवराजांचें आपणांस नुसतें दर्शनच होणार नाहीं तर ज्या प्रमाणें पार्वती मातुश्री आपल्या पतीच्या अंकावर बसल्या आहेत त्याप्रमाणेंच तुह्मी त्यांच्या मांडीवर बसाल.

**मनोरमा**—पुरेगबाई; तुझं आपलं कांहीं सांगणं झालं तरी त्यांत चावटपणा आपला असावयाचाच. मी पुनः तुला कांहीं देखील विचारणार नाहीं.

**दासी**—बाईसाहेब, माझ्या बोलण्याचा आतां तुझांला राग येतो आहे पण हें जर खरं झालं तर आपण मला काय द्याल?

**मनोरमा**—अग तसं झालं तर काय द्याल ह्मणून काय विचारतेस—

## अंजनीगीत.

**सर्वांहुनिही प्रिय सकलांला ॥ प्राण असे जो सखये झाला ॥ तो मजपाशीं तूं मागितला ॥ तरि देइन मीं गें ॥ १ ॥**

( पडद्यांत ) ' प्रिये, अशी इकडून ये. '

**मनोरमा**—सुलोचने, हा बाई माझ्या भावाचा शब्द वाटतो; पण तो प्रिये ह्मणून कोणाला हाक मारितो.

**दासी**—( पाहून ) बाईसाहेब, खरोखर आपले भाऊच इकडे येत आहेत व त्यांच्या बरोबर कोणी एक स्त्री आहे.

**मनोरमा**—काय ह्मणतेस ? त्याच्या बरोबर स्त्री आहे ? काय बाई असेल हें ?

( मनमोहिनीसह चूडामणी प्र. क. )

**चूडामणी**--प्रिये, अगोदर भगवान् शंकरास वंदन करून मग या माझ्या भगिनीला भेट.

**मनमोहिनी**—( तसें करिते )

**मनोरमा**—(विस्मयानें) भाऊराया, हा काय प्रकार आहेरे?

**चूडामणी**—ताई, सर्व सांगतों ऐक—

**पद.**

**जननीजनका युवराजाला मध्यमलोकीं शोधाया ॥ गेलो असतां सुदैवयोगें लाभलि मजला ही जाया ॥ १ ॥ विदर्भनगरी केवळ दुसरी तेथें अलकावति आहे ॥ तत्भूपतिची अनुपम सुंदर ऐसी जाणे दुहिता हे ॥ २ ॥**

आणखी भगिनी ही कशी आहे पहा—

**सौंदर्याची केवळ खाणी तैसी विनयाची मूर्ती ॥ मानवकन्या तरि गुण पाहुनि लज्जित होतिल सुरयुवती ॥ ३ ॥**

तर ताई, तुझी ज्या प्रमाणें मजवर प्रीति आहे त्याप्रमाणेंच आतां इजवर असूं दे.

**मनोरमा**–पण भाऊराया, तुला ज्याकरितां मामंजींनीं मध्यमलोकीं पाठविलं होतं त्याचं काय झालं?

**चूडामणी**– ( दुःखानें ) ताई तुला काय सांगूं?

## साकी.

**तत्शोधास्तव जरि धुंडियली मी सारी ती क्षोणी॥**
**परि दुर्दैवें तिघांतुनि मज नच आढळलें कोणी।।**
**काय करायाचें ॥ यावरि न सुचे कांसाचें ॥ १ ॥**

**मनोरमा**—तूं तसाच परत येशील हें मला पूर्वीं कळून चुकलेंच होतें ह्मणून मी आपला भार देवावर टाकून येथें येऊन राहिलें, असो—

### पद. चाल. युवराजशिवाजिस.

**ज्या दिनिं येइल मम करुणा या महेश्वरा ॥ त्या दिनींच येतिल ते सर्व कीं घरा ॥ धृ ॥ मध्यंतरि केले कुणि यत्न बहुपरीं ॥ सफलता न पावतील ते कधीं तरी ॥ शिवचरणाविण कोणि न दुःख हें हरी ॥ मन्मतिचा ग्रह ऐसा जाहला पुरा ॥ १ ॥**

पण, भाऊराया, तुझं हें कृत्य मामंजीनां पसंत पडेल असं मला कांहीं वाटत नाहीं. इतकेंच नाहीं तर तुला पाठविलें

कशा कारितां व तूं केलेंस काय असें पाहून त्यानां तझा खचित अत्यंत कोप येईल व मग त्याचा परिणाम काय होईल तो माझ्यानें सांगवत नाहीं.

**चूडामणी**–त्यांना कोप येण्यासारखें मजकडून घडलें आहे खरें, पण त्याची काळजी करून काय उपयोग ! जें होणार असेल तें होईल.

**मनमोहिनी**–(स्वगत) अगबाई. मला असं काय होतं हें ?–

**पद**. चाल. अरसिक किति.

**असतां मी पतिपाशीं ॥ कां अपशकुन असा होतो मजशीं ॥ ध्रु० ॥ दक्षिण नेत्रचि लवतो ॥ हा उरही माझा धडधड उडतो ॥ शकुनी निज रव करितो ॥ मज अनिष्ट कांहीं तरि सुचवीतो ॥ प्रसंग पुढचा दिसतो॥तो कठिणाचि बाई करु गति कैसी ॥ १ ॥**

हे त्रैलोक्यनाथा शंकरा, आतां माझी सर्व काळजी तुला आहे. ( पडद्यांत ) अर्से इकडून यावें यक्षाधिराज.--

**दासी**–बाईसाहेब स्वारी देवीसह दर्शनास आली वाटतं.

( तदनंतर स्त्रीसह यक्षराज कुबेर आणि दोन सेवक प्रवेश क.)



**कुबेर-देवी**-( शंकरास वंदनकरून प्रदक्षिणा घालतात. )

**चूडामणी**—यक्षराजांचा विजय असो.

**कुबेर**—कोण अमात्य पुत्र चूडामणी ! वत्सा, तूं मध्यमलोकांहून येथें केव्हां आलांस ?

**चूडामणी**—महाराज, आपणास कृष्णवदन दाखविण्यास हा दुर्भागी आतांच येथें आला.

**देवी**—वत्सा, तुझ्या दुःखित मुद्रेवरून मध्यमलोकीं तुला कोणाचाही शोध लागला नसावा असें वाटतें.

**चूडामणी**—देवींनीं सत्य जाणलें. त्यांचा शोध लावून आपणांकडून वाहवा मिळवून घेण्या इतकें पुण्य माझ्या पदरीं कोठें आहे ? पहा—

### साकी.

**तत्शोधास्तव जरि धुंडियली मी सारी ती क्षोणी ॥ परि दुर्दैवें तीघांतुनि मज नच आढळलें कोणी ॥ काय करायाचें ॥ यावरि न सुचें कीं साचें ॥ १ ॥**

**कुबेर**—( मनमोहिनीस पाहून ) अरे, पण ही कोण ? खचित ही कोणी मानवकन्या आहे.

**चूडामणि**—( लज्जेनें मान खालीं करितो. )

**कुबेर**--समजलों. ( चूडामणिस, रागानें ) हा नीचा, अमाल्य पुत्रा, काय केलेंस हें?—

पद. चाल नाहि सुभद्रा.

लज्जा भीती मुळिं नाहीं कशि राहियली तुजसी।। मदांध होऊनि निजकार्यांते विसरुनि गेलासी ॥ ॥ धृ० ॥ मध्यमलोकीं स्वजनांच्या नच करितां शोधाते ॥ मूढा या मानवकन्येच्या भुलसी रूपाते ॥ तत्प्राप्तीस्तव सर्व काल तूं घालविला तेथें ॥ आज्ञा उल्लंघुनि उपमर्दचि बहु मम केलासी ॥ १ ॥

**देवी**--वत्सा, चूडामणि, अरे, तुला अशी विपरीत वासना झाली तरी कशी ? अरे, आमचें दुःख राहो पण आपल्या बहिणीच्या दुःखाकडे तरी कांहीं लक्ष द्यावयाचें होतेंस.

**चूडामणी**—( हात जोडून ) यक्षराज—

दिंडी.

दास अपराधी पूर्ण असे अपुला ॥ कामवश हो-

उने बहु मदांध झाला ॥ शरण चरणीं या तरी क्षमा याते ॥ करावी या करितसे विनंतीते ॥१॥

**कुबेर**—अरे, नीचा, क्षमा मागण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं ?

## साकी.

दाखविशी वरि एक हेतु परि अंतरिं धरुनी दुसरा ॥ सर्व लोक ते हिंडलास रे तूं अससी पापि पुरा ॥ शासन तुज याचें ॥ देतों घे घे तरि साचें ॥ १ ॥

**चूडामणी**—देवाधिदेवांनीं यावेळीं क्षमा करावी. मी पुनः असें कधीं करणार नाहीं ?

**कुबेर**—छे छे, या पापाचें फळ तुला मिळालेंच पाहिजे. घे हा शाप--

पद. चाल. महाश्वेता नये झडकरि.

कार्य निजशिरिं घेतलेसी ॥ कसा त्याते विसरलासी ॥ यक्ष असतां केवि वरिसी ॥ मानवाच्या सुतेशी या रे ॥ १ ॥ असा लंपट तूं जियेसी ॥ होउनी बहु मत्त होसी ॥ तिच्या भोगीं वियोगासी ॥ जन्मभर दूर राहोनी ॥ २ ॥

( देवीस ) प्रिये चल. ( स्त्री व सेवकासह जातो )

**मनमोहिनी**—हाय हाय !

**पद.** चाल. ( सखये अनुसये )

**दैवा फिरलासी कां मजवरती ॥ जन्माची के-
लिस माती ॥ ध्वनि हे शापाचे नच साहवती ॥
वीज पडे जणुं मजवरतीं ॥ आतां अंतरले जरि
प्राणपती ॥ काय तरी सुख मज पुढतीं ॥ १ ॥**

( धाडकन जमीनीवर अंग टाकते )

**चूडामणी**—हाय हाय .

**पद.** चाल. कांते फार तुला मजसाठीं.

**नकळें कैसें अवचित मजवरि संकट हें आलें ॥
कुबेरशापाग्नीमधि माझें सुखतरुमूळचि ज-
ळुनी गेलें ॥ ध्रु० ॥ निष्कारण मी सुंदरिला या ॥
फसवीले परिणय करुनिया ॥ मित्रतातजन-
नीचें तैसें दर्शनही मज नाहीं घडलें ॥ १ ॥**

प्रिये, सावध हो, सावध हो, माझ्यावर प्रेम ठेऊन तूं व्यर्थ कीं ग फसलीस—

पद. चाल. दैवयोग दुर्विपाक.

**यक्ष न हा राक्षस तरि मूर्तिमंत गे ॥ निजवध तं केलासी या वरोनि गे ॥ चंदनतरु जों चित्तीं मानिलास गें ॥ विषमय तरि आलेना तुज कळोनि गे ॥ आतां जरि गेलों मी तुज त्यजोनि गे॥ काय गती मग तुझी ती होय तरी गे ॥ १ ॥**

**मनोरमा**—भाऊराया, कायरे केलेंस हे ? या हतभागिनीला तुझें देखील दुःख डोळ्यांनीं बघण्याचा प्रसंग यावांना ?

**चूडामणी**—ताई आतां काय करूं ? या प्रसंगापुढें आजपर्यंतचें दुःख कांहींच नाहीं. असें मला वाटूं लागलें आहे. आतां हें दुःख भोगण्यापेक्षां माझे प्राण एकदम जातील तर फार बरें होईल.

**मनोरमा**—अरे, नुसता शोक करून आतां कसा निभाव लागणार ? ज्यांनीं शाप दिला त्यानांच शरण गेल्या शिवाय गत्यंतर नाहीं यासाठीं तूं त्यांच्या मागोमाग लौकर जा आणि घट्ट त्यांचे पाय धर. त्यानीं दया नच केली तर मग सासूबाईच्या हृदयाला द्रव येईल असें त्यांच्या जवळ दुःख कर ह्मणजे त्या खाचित त्यांच्याकडून पुनः तुजवर कृपा करवतील.

**चडामणी**—ताई, तूं चांगलें सांगितलेंस ही दुःख करण्याची वेळ नव्हे यासाठीं ह्या मी त्यांच्याकडे जातो. तूं हिच्या डोळ्यांस पाणी लावून सावध कर.

**मनोरमा**—जा लौकर. ( चूडामणी जातो ) सुलोचने, मला व्रत सोडून देवालयांतून कांहीं बाहेर येतां येत नाहीं यासाठीं तूं हिला महालांत नेऊन पलंगावर निजीव व तिच्या डोळ्यांस पाणी लाव ह्मणजे कांहीं वेळानें ती सावध होईल.

**दासी**—आज्ञा बाईसाहेब.

**मनोरमा**—हे भगवंता—

**अंजनीगीत.**

**मत्बंधूवरि करि अनुकंपा ॥ देण्या कांहीं त्या उःश्शापा ॥ यक्षेंद्रासी बुद्धी बापा ॥ देई तूं आतां१॥**

( पडदा पडतो )

---

## प्रवेश २ रा. चूडामणीचें मंदीर.

( तदनंतर चूडामणी प्र क. )

**चूडामणी**—जे अधिकारानें थोर आहते त्यांचें मनही थोर असतें. पहा. महाराज यक्षपती यांचा मी अपराधी ठर-

त्यामुळें त्यांनीं मला शाप दिला तेव्हां पुढें सुखाची ह्मणून मला मुळीं आशाच राहिली नव्हती. पण भगिनीनें सांगितल्यावरून मी जेव्हां पुनः त्यांस शरण गेलों व त्यांची आणि देवीची पुष्कळ प्रार्थना केली तेव्हां त्यांचा सर्व कोप एकदम नाहींसा होऊन त्यांनीं मजवर प्रसाद केला. मात्र इतकेंच सांगितलें कीं.—

पद. चाल. वीराभ्रमरा किंवा. नचदृष्टिस.

**एकवार जी खर शापोक्ती गेलो मी बोलुनी ॥ मिथ्या राहिल नच होउनी ॥ १ ॥ एकवर्ष तरि दुःख भोगणें पडेल तुजलागुनी ॥ सोडिलि पाहीजे कामिनी ॥ वियोग कंठी तोंवरि तीचा कोठें तरि राहुनी ॥ धरुनी थोर धैर्य निजमनीं ॥३॥ नंतर आनंदानें येथें राहे तिस घेउनी ॥ त्याचा कोप न मजलागुनी ॥ ४ ॥**

आतां ज्या प्राणदायितेला एक क्षणभर देखील सोडून दूर राहणें ह्मणजे मला प्राणसंकट वाटतें तिचा एक वर्ष वियोग हा मजवर केवळ वज्रपातच होय. परंतु सर्वस्वींच जो तिला मुकलों होतो त्याची समाप्ति इतक्यावरच झाली हें माझें मोठें सुदैव नव्हे कां ? आतां प्राणप्रियेला भेटून तिचा निरोप घेऊन

कठें तरी मृत्युलोकींच एकाद्या पुण्यक्षेत्रीं जाऊन हें युगवर्ष कठावें. हें वर्तमान मी भगिनीला सांगून तिची जाण्यास परवानगी घेतली. आतां प्रिया मूर्च्छींत पडली असतां तिला महालांत नेऊन ठेविली असे तिनें सांगितलें आहे तर तिकडेच जावें. ( पाहून ) अहाहा ! ही पहा माझी प्रिया कशी सचिंत होत्सातां बसली आहे.–

पद. चाल. हिमधवलांगी.

**चित्तीं उरली नच सौख्याशा झाली दुःखित किति ही ह्मणुनी ॥ दुःखाश्रु वाहाति नयनांतुनि त्या परि मुख बहु गेले सुकुनी ॥ क्षीण कला जशि विधुची होते ॥ त्यापरि बघतो मी प्रियसखितें ॥**

( तदनंतर सचित बसलेली मनमोहिनी प्र. क. )

**मनमोहिनी**–ह्मण जी आहे ती खरी आहे कीं ज्याच्या कपाळीं सुख नाहीं त्याला तें त्रिभुवनांत देखील लागावयाचें नाहीं पहा--

पद. चाल. बहुनोपतरू किंवा दवंडुनका.

**मज यक्ष थोर पति मिळतां हर्ष होऊनी ॥ त्या वरिलें जनकासी नच विचारुनी ॥ ध्रु० ॥ सौख्याशा मग मोठी मनिं धरोनियां ॥ आलें त्या-**

**सह अलकावतिपुरींत या ॥ पण दैवीं नच मिळेल तें कुठोनियां ॥ तत् चिरविरहानलिं पडले मुळिंच येथुनी ॥ १ ॥**

हायहाय. ! परमेश्वरा, आतां त्यांच्या शिवाय मी काय करूं ? हा माझा प्राण कां एकदम जात नाहीं ? किंवा मला यास कोणी कांहीं उपाय कां सांगत नाहीं. ? पद्य--

पद्. चाल. मर्यादा सोडुनि वदणें.

**अल्पायू पति जरि होता तरि सावित्रीनें वरिला ॥ त्यासह सुख सेवायाचा दृढ निश्चय तीनें केला मग नारद मुनिनें तिजला व्रत नियोग कीं सांगितला ॥ चाल ॥ पति सुटण्या शापा मधुनी ॥ व्रत दुर्घट त्यापरि कोणी ॥ ॥ जरि कथिलें मजलागोनी ॥ आचरीन तरि मी त्याला ॥ चाल ॥ परि वियोग हा प्रियपतिचा सोसवेल नच मुळिं मजला ॥ १ ॥**

**चूडामणी**— ( पुढें होऊन ) शाबास ! प्रिये ! तुझा जर इतका दृढनिश्चय झालेला आहे तर तें व्रत तुला मीच सांगतों.

**मनमोहिनी**--कोण प्राणनाथ! ( त्याच्या गळ्यास मिठी मारून )

पद. चाल. तेथेंच उभी कीं.

**या हतभागिनिनें अपुला ॥ सर्वथैव घातचि केला ॥ प्रियकरा ॥ जरि कथिलें नच येण्याला ॥ ऐकिलेंन त्या समयाला ॥ प्रियकरा ॥ धनदाच्या खर कोपाला ॥ तुह्मां कारण ही अबला ॥ प्रियकरा ॥ चाल ॥ आपली ॥ स्त्री न ही तरी ॥ वैरिणी खरी ॥ पूर्व जन्मींची ॥ सूड आज घेई साची ॥ प्रियकरा ॥ १ ॥**

**चूडामणी**—छे, छे, प्रिये, असें ह्मणूं नकोस. तूं असें ह्मटलेंस ह्मणजे मात्र तुझ्या सुखाविषयीं माझी मुळींच निराशा झाली.

**मनमोहिनी**—नाहीं तरी आतां कसली आशा राहिलि आहे?

**चूडामणी**—प्रिये, अशी निराश कां होतेंस? यक्षपतीच्या शापानें दग्ध झालेल्या माझ्या सौख्यतरूस तुझ्या सुदैवरूप जलानें पुनः अंकुर फुटले.

**मनमोहिनी**—प्राणनाथ ? खरंच कां महाराजांना आपली या येऊन त्यांनीं आपला शाप परत घेतला ?

**चूडामणी**—ऐक सर्व सांगतों. तो शाप ऐकून तूं मूर्च्छीत डली असतां मी लागलीच पूनः महाराजांस शरण जाऊन यांची प्रार्थना केली असतां त्यांनीं प्रसन्न होऊन असा उशाप दिला कीं—

**साकी.**

**एकवर्ष तूं मत्शापानें अंतरुनी दयितेला ॥ नंतर तिजसह चिरकालिक त्या सेविशील सौख्याला ॥ तोंवरि दुःखाचा॥निरोध धैर्यें करिशी साचा॥ १ ॥**

**मनमोहिनी**—मग यांत दुःख तें काय कमी झालं ? एक वर्षांत आपला वियोग सोसून मी जिवंत राहिले तर ना ती सुखाची गोष्ट.

**चूडामणी**—प्रिये, तूं शहाणी असतां असें कां बरें भलतेंच ह्मणतेस ?

पद. चाल. काय मला भूल.

**धैर्यें ममविरहाचें दुःख हें असे ॥ एक वर्ष मात्र करीं सहन तरि कसें ॥ सकल सुखी या भुवनीं**

**कोण गे असे॥ चक्रनेमिपरि त्या सुख दुःख येतसे॥ मजविषयीं प्रेम पूर्ण तव मनीं वसे ॥ तरि परिमित विरहदुःख कठिण मुळिं नसे ॥ १ ॥**

**मनमोहिनी**—आपण ह्मणतां ते बरोबर आहे. पुरुषांस एकवर्ष ह्मणजे कांहीं नाहीं पण ते आह्मां बायकांचा प्राण घेण्याला पुरे आहे.

**चूडामणी**—छे छे प्रिये, तसें नाहीं बरें? तुजप्रमाणेंच एक वर्ष तुला सोडून जाणें मला प्राणसंकट वाटत आहे पण काय करूं? मला गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**मनमोहिनी**—हायहाय! देवा, मजकडून असें कोणतें पातक घडलें होतें ह्मणून त्याकरितां हें असें दुःख देतो आहेस.

**चूडामणी**—प्रिये, उगीच देवाला दोष लावूं नकोस. त्याच्याच कृपेनें आपलें चिरकालिक दुःख अल्पकालिक झालें आहे.

**मनमोहिनी**—प्राणनाथ, पण या हतभागिनीला सोडून आतां एक वर्षपर्यंत आपण कोठें जाऊन राहणार?

**चूडामणी**—प्रिये, माझा असा विचार झाला आहे कीं—

पद. चाल. रुतला दर्भांकुर.

**जेथें सीतेसह वसती ॥ श्री रामें केली होती ॥ तेणें पवित्रता बहु ती ॥ ये ज्या रामगिरीवरती ॥**

**तेथं जाउनि तव विरहाचें दुःखद हें कांते ॥ वर्ष करें तरि पूर्ण करावे मन्मनि कीं येतें॥१ ॥**

**मनमोहिनी**—असो. आपण परत येईपर्यंत हे आपलें विरहवर्ष मी वन्संबरोबर त्रैलोक्यनाथ शंकराचें तप करून घालवीन.

**चुडामणी**---छेले, प्रिये, असें करूं नकोस. या तुझ्या कृतीनें अगोदरच भारभूत झालेल्या या तुझ्या वियोगदुःखांत मला आणखीं दुःख होईल कारण---

दिंडी.

**असे कोमल ही फार तुझी काया ॥ तपानें त्या जाईल सुकोनिया ॥ दशा मग तशि तुझि सतत दिसोनीयां ॥ दुःख त्या स्थलिं होईल मन्म-नाया ॥ १ ॥**

**मनमोहिनी**---आपण असें ह्मणतां तर मग आपला वि-योगकाल मी कसा कंठावा---

**चुडामणी**--प्रिये, मी सांगतों त्याप्रमाणें कर---पहा---

**पद.** चाल. आकर्षुनिंधनु.

**प्रकार नाना मन्मंदिरिं या असतो निजमन रम-**

वाया ॥ पूर्ण चतुरतूं त्यापासुनि गे घेशिल अ-
पुणा रमवुनियां ॥ १ ॥ कल्पतरू हा मी ला-
वियला जो लवला सुमगुच्छांनीं ॥ पुत्रस्नेहें
पाळी त्यातें पाणी प्रतिदिनिं घालोनी २ ॥
आवडता हा मोर असे मम याला शिकवी ना-
चाया निज वामचरणघातें कुसुमें अशोक त-
रुला आणी या ॥ ३ ॥

प्रिये, यारीतीनें कसेंतरि
माझ्या मनाला धीर
मजजवळ दे ह्मणजे
धान वाटेल. आणख
गती करतां येत ना
यासाठीं एकवार प्रेम

**मनमोहिनी**—
मिठीमारून )

**प्रिया**—

**ही दीन दासि**
**करिते विनव**
**अठवण राहि**

**चूडामणी**--प्रिये, भलताच संशय घेऊन हें काय बरें विचारतेस. पहा—

साकी.

**देह दूर मम जातो तरि मन ठेवियलें तुजपाशीं ॥ अठवण तुझि मग विसरुनि मजला जातां येइल कैसी ॥ येतो तरि आतां ॥ नकरी कसलीही चिंता ॥ १ ॥**

( पडदा पडतो )

---

## प्रवेश २ रा. मनोरमेचा महाल.

( पडद्यांत मंगलवाद्यें वाजतात व तीं ऐकत मनमोहिनी प्र. क.)

**मनमोहिनी**—आजकाल ही अलकावती ह्मणजे दुःखाचें माहेरघर होऊन राहिली आहे. असें असतां ही मंगलवाद्यें कां बरें वाजतात-( पाहून ) हा वन्संची दासी सुलोचना इकडे येत आहे तर तिला विचारून पहावें. ( सुलोचना येते ) का-यग सुलोचने, आज हीं मंगलवाद्यें वाजताआहेत व जिकडे तिकडे आनंदाचे उत्सव चालू आहेत याचे कारण काय ?

**दासी**—नाईसाहेब, तुह्मांला कांहींच कां माहीत

नाहीं ? अथवा तुह्मी आपल्याच दुःखांत चूर आहांत तेव्हां तुह्माला कसें माहीत असणार ? ऐका तर मी सांगतें. आपल्या मनोरमा बाईसाहेबांचें पति आज येणार आहेत ह्मणून महाराजांच्या आज्ञेनें सर्व यक्ष हे महोत्सव करीत आहेत.

**मनमोहिनी**—असें कां ? मग तूं ही मला मोठीच आनंदाची गोष्ट सांगितलीस. पण तें आज कशावरून येणार ?

**दासी**—कशावरून ह्मणजे बाईसाहेबांनीं तपश्चर्याच तशी केली. ऐका. काल बाईसाहेबांच्या तपानें संतुष्ट झालेल्या भगवान् महेश्वरांनीं पार्वतीसह बाईसाहेबांना दर्शन देऊन त्यांस सांगितलें कीं, मी तुझ्या तपानें प्रसन्न झालों तर आतां ही तपश्चर्या पुरें करून तूं घरीं जा. आजच तुझा पती येऊन तुला भेटेल.

**मनमोहिनी**—मग तर ते आज खास येणार. बरं पण मामंजी व सासूबाईविषयीं भगवंतांनीं काय सांगितलं ?

**दासी**—तेही लौकरच येऊन तुला भेटतील असं त्यांनीं सांगितलं. नंतर कालच बाईसाहेब वाड्यांत येऊन त्यांनीं हें वर्तमान महाराजांस कळवलं असतां त्यांस व सर्वांस अत्यानंद होऊन आज युवराज येणार ह्मणून जिकडे तिकडे उत्सव करण्याविषयीं त्यांनीं सर्वत्रांस आज्ञा केली. ताईसाहेब, तुह्मांला

काय सांगूं ? आज आपले चूडामणी येथें असते तर त्यांना कितीतरी आनंद झाला असता ?

**मनमोहिनी**—झाला असतां पण देवाच्या मनांत तसें नाहीं याला कोणाचा काय उपाय ? बरं पण वन्सं आतां कुठं आहेत?

**दासी**—त्यांनीं नुकतंच मंगलस्नान केलं असून त्या आतां अंगावर अलंकार घालीत आहेत. इतक्यांत महालांत येतील. हे पहा ताईसाहेब, आज त्यांना कांहीं बोलावयाचं नाहीं पण उद्यां त्यांची खूप थट्टा करावयाची.

**मनमोहिनी**—( मनांत ) मी त्यांची खुप थट्टा केली असती पण माझं मन कुठें आनंदांत आहे. प्राणनाथांच्या विरहामुळें हे प्राण देखील मला जड झाले आहेत. हे भगवन् गौरीनाथा वन्संप्रमाणें माझे पति कधीं मला आणून भेटवशील. ( उघड ) बरे तुझ्या मनांत आहे तर त्याला कांहीं माझी ना नाहीं. पण आतां मी जाते.

**दासी**—उद्यां पण खास इकडं आलं पाहिजे हो. बहुत करून बाईसाहेबांच्या सांगण्यावरून मीच तुह्मांला बोलवायला येईन.

**मनमोहिनी**—बरं आहे. ( असें ह्मणून जाते )

**दासी**--बाईसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें मी सर्व महाल तर शृंगारून ठेवला व कल्पवृक्षाच्या फुलांचे हार व गजरेही तयार करून ठेवले. पण अजून त्या कां बरें येत नाहींत? (पाहून) त्या पहा आल्याच.

( तदनंतर सर्वांगावर अलंकार घातलेली मनोरमा प्र. क. )

**मनोरमा**—

पद. चाल. पाहेन सिंहासनिं.

**प्रसन्नहोऊनि गिरिजानाथें काल दिला तो वर मला ॥ तेणें गगनामधिं नच मावे हर्ष असा मनिं जाहला ॥ १ ॥ भेटतात कधीं आतां येऊनि प्राणपतीते या वरी ॥ उत्कंठा अशि लागुनि सांप्रत झाले बहु मी बावरी ॥ त्यांना येण्या जरि तो थोडा अवधी आहे राहिला ॥ तरि युगापरी अंतरि मोठा जणु वाटुनि मज राहिला ॥ २ ॥**

( दासीस ) सुलोचने, तुला महालातली सर्व तयारी करण्याकरितां पाठविली असतां तूं अद्यापि आपली हात जोडून येथेंच उभी आहेसनां?

**दासी**--बाईसाहेब, आपल्या आज्ञेप्रमाणें केव्हांच सर्व

तयारी करून ठेविली आहे. पण आपलें सारे लक्षच जर आज एकीकडे गुंतुन गेले आहे तर या गरीब दासींची सेवा आपणांस कशी दिसून येणार ?

**मनोरमा**—( पाहून ) सुलोचने, अशी रागावूं नकोस. खरेंच गडे, आजकीं नाहीं मला अगदीं भांबावल्या सारखं झालं आहे.

**दासी**—पण बाईसाहेब, आतां युवराज आले ह्मणजे आपण काय करणार ?

**मनोरमा**—काय करणार ह्मणजे.

पद. चाल. नंद गृहाच्या जवळिल.

**प्रियकर मम तो दृष्टीस पडतां धांवत जावोनी ॥ आलिंगिन त्या कडकडुनी ॥धृ.॥ आजवरी जें व्रत करुनीया ॥ शिणविलि सखये मी निजकाया॥ तरि या कृतिनें त्या सुखवुनिया ॥ तत्फल पूर्णमनीं ॥ मानिन मिळलें आज दिनीं ॥ १ ॥**

**दासी**—छे छे, बाईसाव, असें नका करूं. त्यानें तुह्मांला व्हावा तसा आनंद होणार नाहीं.

**मनोरमा**—तर मग कसें करूं ह्मणतेंस. ?

**दासी**—मी सांगतें त्याप्रमाणें करा. ते आले कीं तुम्हीं

त्यांच्याशीं बराच वेळ मुळीं बोलूं नका. आणि ते जर तुमच्या आंगाला स्पर्श करूं लागले तर रागावून झिडकारल्या सारखे करा. आणि मग पहा कशी मौज होतेती.

**मनोरमा**—पण तूं म्हणतेस तसें मी केलें आणखी ते रागावून मुळींच मजबरोबर बोलेनासे झाले तर ?

**दासी**—बाईसाहेब, ही काय भलतीच शंका. ? चुंबकमणी संनिध एकदां लोह आलें म्हणजे तो फिरवील तसें त्याला फिरले पाहिजे. मग लोहाच्या स्वाधीन कांहीं रहात नाहीं.

**मनोरमा**—बरं तर तूं सांगतेस तसंच करिते.

**दासी**—( मनांत ) आतां आपण येथें राहूंनये. ( उघड ) बाईसाहेब, ताईसाहेबांनीं मला बोलाव.. आहे तर तिकडे मी जाऊं कां ?

**मनोरमा**—जा आणखी, उद्यां वहिनीला मी बोलावलं आहे असं सांग.

**दासी**—( जाते )

**मनोरमा**—ही सुलोचना म्हणाली त्याप्रमाणें मी खोटा राग आणून एकळ बसेन म्हणतें पण बहुतकरून तो टिकणें कठीण आहे. कारण—

पद.

कामानें व्याकुल मी फार जाहलें ॥ या समयीं भान मुळीं मज न राहिले ॥ धृ० ॥ विधु येतां उदयाला ॥ विकसन ये कमलिनिला ॥ टाळवे न जेंवि तिला ॥ आलिंगन प्रिय पतिला ॥ देणें कीं स्वाधिन मम हें न राहिलें ॥ १ ॥

( पिंजऱ्यांत राघू ओरडतो ) हा कोणाचा बरें शब्द. समजलें. हा माझा आणखी प्राणनाथांचा आवडता शुक. ( जवळ जाऊन ) अरे, शुका, तुला वाटलें असेल मी तुला विसरलें. पण तसें नाहीं बरें.

पद. चाल. हें काय बरें ही.

बहु काल पती विरहाला ॥ कंठित असतां पुसलें न तुला ॥ धृ० ॥ तरि त्याचा मनिं कोपचि धरुनी ॥ बसूं नको बा मजवरि रुसुनी ॥ पूर्वींपरि निज मधु शब्दांनीं ॥ रमवी मन्मन शुकबाला ॥ १ ॥

( पाहून ) अगबाई ! काल भगवंतानीं सांगितलेली वेळ तर झाली मग आता प्राणनाथ कां बरे येत नाहींत पहा—

## साकी.

मज त्या बघण्या वांचुनि दुसरें कांहीं न सुचे
आतां कुतर्क नानापरिचे सांप्रत घाबरविति या
चित्ता ॥ १ ॥

( सचिंत बसते, व नलकूबर प्र. क.)

**नलकूबर**—अहाहा ! परमेश्वराचा हा नियम कसा सर्वत्र लागू आहे पहा—

**पद.** चाल. ठाऊक मजला. किंवा अर्जुनतर.

तापद ऐसा दिन तो किती ही जरि मोठा झाला॥
निशाकाळ सुखकारक अंतीं आहे ठरलेला ॥ त्या-
परि भोगुनि आजवरी कीं मी बहु दुःखाला ॥
सुखसेवाया सांप्रत आलों या अलकावतिला ॥१॥

आज माझ्या विरहानें व्याकुळ झालेल्या माझ्या मातापित-रांना भेटून मला किती तरी आनंद झाला ! आतां या सर्वांत दुःख ह्मणून मला इतकेंच वाटतें कीं—

## साकी.

प्राणाहुनिही प्रिय ऐसा मम मित्रचि चूडामणि

**तो ॥ मज्जनकाच्या शापें जवळी नच मज भेटा-**
**या तो ॥ रामगिरीं गेला ॥ कंठाया स्त्री विर-**
**हाला ॥ १ ॥**

असो. सुदैवानें त्याला तातांनीं उश्शाप दिला व आजन्म स्त्रीला मुकला होता तो एक वर्षाच्याच विरहांत पडला. तेव्हां तेथून तो शापमुक्त होईपर्यंत आपणांस त्याचें वियोग दुःख सोसलें पाहिजे. आंता अगोंदर---

**दिंडी.**

**प्राण केवळ जो ममचि शरीराला ॥ मद्वियोगें बहु**
**दुःख होय जीला ॥ कधीं पाहिन त्या प्रिय मनो-**
**रमेला ॥ फार उत्कंठा लागली मनाला ॥ १ ॥**

हाच माझ्या प्रियेचा महाल. ( पाहून ) आणखी ही पहा माझी प्रिया ?

पद. राग मालकंस.

**पुनरपि येउनि मी भेटाया ॥ ईशाजवळीं दुर्घट**
**तप तें करुनी सखिनें शिणाविली काया ॥ धृ० ॥**
**त्यामुळेंचि मी निजरूपाला ॥ पावुनी आलों त-**
**न्मानसिचा आज हेतु कीं तो पुरवाया ॥ १ ॥**

बरें, पण आज मी येऊन भेटणार असें भगवंतांनीं इला अश्वासन दिलें असतां इच्या मुखावर आनंद दिसावयाचा तो नसून ही अशी कष्टी कांबरें दिसते ?

**मनोरमा**—अजून येत नाहींत तेव्हां माझ्या दुर्दैवानें श्री शंकराचा वर देखील खोटा केला कीं काय ? कांहीं असो. आणखी प्रहरभर वाट पाहिन आणि तोंवर नच आले तर—

**पद**. चाल. आर्या तीच असे.

**एक क्षणही नच धारणहा प्राण करिन मी त्यावरी ॥ काय होय मग सुख तें मजला राहुनि येथें मंदिरी ॥ १ ॥ तप करणें बहु दुःसह झालें ह्मणुनी खोटें सांगुनी ॥ गृहिं मनोरमा आली सारे दूषितील मजलागुनी ॥ २ ॥**

**नलकूबर**—अहाहा ! हीतर माझ्यावाटेकडे डोळे लावून बसली आहे मग आतां तिला भेटण्यास उशीर कां करावा ? ( पुढें होऊन ) प्रिये, असले हें भलतेंच काय साहस करतेंस?-

**मनोरमा**—अगबाई आले. ( आलिंगन देण्यास पुढें होऊन पुनः मागे सरून ) पण छे—

पद. चाल. भावण किति मधुर.

नको नको योग्य नसे मी आलिंगावया ॥ झ-
णावया तशि अजुणां याकालीं कीं प्रिया ॥ १ ॥

नलकूबर—

प्रियकर तव नलकूबर आला हा कासया ॥
झिडकारिसि त्या सखये अशि दूर सरोनिया ।२॥

मनोरमा—
स्त्री जाती बहु भोळी आहे या जगिं खरी ॥
वागतसे विश्वासा ठेवुनि पुरुषावरी ॥ ३ ॥

नलकूबर—

भलभलते हे विचार आणुनिया अंतरीं ॥ व्यर्थ
कोप मजवरि कां धरिसी तूं सुंदरी ॥ ४ ॥

प्रिये, पुष्कळ दिवस तुझ्या आलिंगन सुखास अंतरलेल्या या नलकूबराचा मनोरथ पूर्ण करण्यास विलंब कां वरं करतेंस?

**मनोरमा**—छे, हे वरवरचे बोलणं मला सर्व कळतें. आज मी कांहीं आपली पहिली मनोरमा राहिले नाहीं. मग उगींच कशाला बरं माझ्या शरीराला स्पर्श करून आपणाला विटाळ करून घेतां ? तर—

पद. चाल. निष्कारण हंसताना

आजवरी ज्या सुंदरीनें बहु सुखवीले अपुणाला ॥
तिजकडेस जा आनंदानें नाथा या समयाला ॥१॥

नलकुबर--

वर्तमान मम खरें असें तें ठाऊक नसतां तुजला ॥
कैसे वदसी कठोर वचनें काय सखे ह्मणुं याला।२।

मनोरमा—

कांहीं नाहीं सर्व कळे मज सोडुनि कांहो गेला ॥
देवसुता कीं नागसुता कुणि प्रिय झाली तु-
ह्माला ॥ ३ ॥

नलकुबर—

वेडे ऐसे कुतर्क घेउनि दुखविसि कां चित्ताला ॥
लौकरि आलिंगन दे कथितों मग मम वृत्तांताला।४।

( तिला बळेंच आलिंगन देतो. )

**मनोरमा**--खरेंच प्राणनाथ, इतके दिवस या हतभागि-
नीला सोडून आपण कोठें जाऊन राहिला होता ?

**नलकुबर**--प्रिये, तें सर्व वर्तमान जरी अत्यंत दुःख दा-

यक्ष आहे तरी तुला सांगून तुझा संशय दूर करणें मला भाग आहे. ऐक तुझ्या कानांत सांगतों. ( तसें करून ) प्रिये—

## साकी.

**ऐशा दुःखामधिं आजवरि होतो जाउनि पडलों॥**
**तवतपोबलें त्यातुनि आहे सांप्रत बघ मी सुटलों॥**
**संशय तरि आतां ॥ न धरी यावरि मनिं भलता ॥**

**मनोरमा**—हाय हाय! प्राणनाथ, या अभागिनीच्या प्रेमातिशयामुळें आपण अशा दुःखांत जाऊन पडला होताना?

**नलकुबर**—प्रिये,त्याबद्दलच्या सर्व दुःखांतून तुला आलिंगन देतांक्षणींच मी मुक्त झालों असे मी समजतों.

**मनोरमा**—आज माझा भाऊराया येथें असता तर आपण आल्यामुळें त्याला कितितरि आनंद झाला असता?

**चूडामणी**—तें सर्व वर्तमान तातांच्या मुखांतूनच मला कळलें आहे. माझ्या मित्रास मजसाठीं इतकें श्रम पडले असतां व त्यानेंच मला पुनः या रूपाला आणलें असतां अखेर त्याला शापच मिळाला तेव्हां दैवगती विचित्र आहे. असो. यांत आनंदाची ही एक गोष्ट आहे कीं त्याला मिळालेली स्त्री त्रिभुवन सुंदरी असून तिच्या अंगांत अनेक सद्गुण आहेत.

**मनोरमा**—आपण येथें आला ते मामंजींना भेटून आला

तर. ह्मणूनच बरें काल भगवंतांनीं सांगितलेल्या वेळापेक्षां अधिक उशीरानें आपली माझी भेट झाली.

**नलकूबर**—प्रिये,आतां आपल्या चूडामणीचा शाप संपल्या-वर आपण त्याला स्वतः आणायाला जाऊं बरं कां ?

**मनोरमा**—पण प्राणनाथ, माझे बाबा व आई आतां कधीं येणार ?

**नलकूबर**—त्याविषयीं काळजी कशाला करतेंस. भग-वंतांनीं तुला आश्वासन दिलें आहे तेव्हां ते येणारच. आतां या आनंदाच्या वेळीं मनांत कसलेंही दुःख ठेवूं नकोंस. ( पोपट ओरडतो ) हा शब्द कोणाचा बरें ?

**मनोरमा**—इतक्या दिवसांत आपल्या आवडत्या शुकाला विसरलातनां? माझी ओळख राहिली हे तरी भाग्यच ह्मणावयाचं.

**नलकूबर**—अहाग वेडे, मी त्याला कधीं तरी विसरेन कां ? कोठें आहे तो ? (जवळ जाऊन) माझ्या लाडक्या शुका.

## दिंडी.

**किती निर्दय मी टाकुनीया तूंतें ॥ दूर गेलों कीं**
**दुःख भोगण्यातें ॥ तरी आतां मुळिं तें न मनीं ॥**
**शुका ऐकवि मज तुझी गोडवाणी ॥ १ ॥**

**मनोरमा**—पक्षांना कांहीं ज्ञान नसतें ह्मणतात ना ? पण हा पहा कसा लबाड आहे तो. आजपर्यंत मी जवळ आले असतां मजकडे बघत देखील नव्हता पण आतां पहा कसा आनंदानं उडावयाला लागला तो. पण मी एका चांगल्या मैनेशी त्याचं लग्न करून देण्याचं त्याला वचन दिलं आहे तें आपण लौकर पूर्ण केलं पाहिजे बरं कां ?

**नलकूबर**—अग, अवश्य पूर्ण करीन. तूं वचन दिलेंस काय आणि मी दिलं काय एकच. बरे पण ही रात्र आतां फुकट किति घालवावयाची. आतां आपल्या मागील क्रमाप्रमाणें करावयास कां विलंब करतेस—

## श्लोक.

**अंगासी निज अंग लावि सखये गालावरी गालते ॥ ठेवी गुंतविता करांत कर गे हें चित्त संतोषते ॥ चुंबाया अधरांस या तव असे झाला उतावीळ हा ॥ मौल्याचा किती काल हें न करितां हा व्यर्थ जातो पहा ॥ १ ॥**

( तिला आलिंगन देतो व पडदा पडतो. )

## अंक पांचवा समाप्त.

# अंक ६ वा.

## प्रवेश १ ला. स्थळ. रामगिरी.

( तदनंतर वासंनि नांवाची वनदेवता प्र. क. )

**वनदेवता**—यक्षराज कुबेर यांचे प्रधान अमात्य इंद्रसेन आपली पत्नी इंदुमती इजसह सृष्ट चमत्कार पाहण्याकरितां नेहमीं या रामगिरीवर येत असत. त्याप्रमाणें ते येथें असतानां एकेवेळीं असा कांहीं विलक्षण प्रकार घडून आला कीं विदर्भ नगरीचा चित्रांगद राजा हा आपली राणी सुशीला व प्रधानादि इतर परिवार यासह कांहीं दिवस वनविहार करण्याकरितां याच रामगिरीवर येऊन राहिला होता. एकेदिवशीं आपल्या विश्राम मंदिरांत राजा व त्याची स्त्री निद्रिस्थ असतां त्यांच्या दुर्दैवानें त्यांस सर्पदंश होऊन तीं उभयतां मृत्यु पावली. मग हा प्रकार प्रधानाच्या दृष्टीस पडतांच त्यानें त्वरा करून अनेक धन्वंतरी आणून सर्पविष उतरविण्याचा प्रयत्न केला पण तो सर्वथैव व्यर्थ झाला. मग तो राजपरिवार त्यामुळें शोकाकुल होऊन राहिला असतां तो सर्व प्रकार आपल्या नेत्रांनीं पाहिलेल्या

अमात्य इंद्रसेन व त्यांची पत्नी यांच्या मनांत एकाएकीं कांहा दिवस मृत्युलोकचें राजसुख भोगावें असा विचार आला व त्यांनी मला बोलावून ' आह्मी किंचित् काल मध्यमलोकचें राजसुख अनुभवून परत येतो तोंपर्यंत तूं आमच्या शरीरांचें रक्षण कर ' असें सांगून व आपलीं शरीरें माझ्या स्वाधीन करून परकाया प्रवेशिनी विद्येच्या बलानें त्या मृत राजदंपत्याच्या शरीरांत उभयतांनीं आपले प्राण घातले व त्यामुळें झोंपेतून सावध झाल्याप्रमाणें प्रधानादि सर्वांस वाटून त्यांनीं परमेश्वराचे आभार मानिले व ते अत्यानंदानें विदर्भनगरीस परत गेले. आतां या गोष्टीस आज एक तप लोटलें पण अद्यापि अमात्य इंद्रसेन व त्यांची पत्नी यांच्या प्राणांस राजसुख सोडून आपल्या शरीरांत प्रवेश करावेसें वाटत नाहीं व मलाही आपलें नित्य कर्म सोडून तिकडे जातां येत नाहीं. सांप्रत मला असें वर्तमान कळलें आहे कीं महाराज यक्षराज कुबेर यांची त्यांच्या प्रीतींतील एका यक्षावर गैरमर्जी होऊन त्यांनीं त्याला शाप दिल्यामुळें तो यक्ष रामगिरीवर येऊन आश्रम बांधून राहिला आहे तर आतां आपण अगोदर त्याचा शोध करून त्याला हें सर्व वर्तमान सांगावें व त्यालाच विदर्भ नगरीला पाठवून राजसुखांत रममाण झालेल्या अमात्य इंद्रसेन व त्यांची पत्नी यां-

च्या प्राणांस त्यांची पूर्वीची ओळख देऊन ते पुनरपि येथें येऊन आपल्या शरीरांत प्रवेश करतील व त्यांच्या देहांचें अहोरात्र संरक्षण करण्याचें जें दुर्घट कार्य मजकडे आहे त्यांतून मला मुक्त करतील असें केलें पाहिजे. तर मग आतां त्याकडेस जावें.

( असें म्हणून निघून जाते )

---

## प्रवेश २ रा. स्थळ. रामगिरीवरील वनप्रदेश.

( स्त्री विरहानें व्याकुल झालेला चूडामणी प्र. क. )

**चूडामणी**—हाय हाय ! प्राणसखे, मनमोहिनी, महाराजांच्या शापामुळें मी तुला वियोग दुःखांत लोटून इकडे आल्यानें तुझी काय दशा झाली असेल ? आजपर्यंतचें विरह दुःख तूं कसेतरी सहन केलें असशील पण आतां तें सहन करणें तुला कठीण आहे. कारण—

पद. चाल. अभिनव मधु

**सांप्रत हा वर्षाऋतु काल येउनी ॥ व्याकुल करि सुखिताही फारचे मनीं ॥ ध्रु. ॥ जलधारा घन**

**वर्षति ॥ चपला बहु चमकताति ॥ आनंदे शिखि- नाचति ॥ सर्व तरू फुलुनि जाति ॥ चाल ॥ पति नसतां मग ऐसा समय पाहुनी ॥ नवल काय करिते जरि दुःख विरहिणी ॥ १ ॥**

खचित प्रिये, अशावेळीं तूं कोणत्या स्थितींत आहेस हें मला येथून दिसत आहें—

## साकी.

**दशमुख सदनीं रघुवीराच्या विरहें सीता जैसी ॥**
**दुःखानें दिन कंठित होती करुनी तत्स्मरणासी ॥**
**मद्विरहें तैसी ॥ आली आहे गति तुजसी ॥ १ ॥**

पण प्रिये, ज्याप्रमाणें मारुतीला पाठवून रामचंद्रानें आपल्या स्त्रीचें समाधान केलें त्याप्रमाणें मला तुझें करितां येईल कां [ विचारकरून ] अथवा, न यायाला काय झालें? आपणही एकादा दूत पाठवून त्याच्या हस्तें आपले कुशल वृत्त प्रियेला कळवावें ह्मणजे हा दुःसह वर्षाकाल कंठण्यास तिच्या मनास धीर येईल. पण आपला निरोप तिजकडे घेऊन जाणारा कोण बरें मिळेल? ( वर पाहून ) वाहवा! ठीक. आपलें काम

झालें. या पर्वताच्या शिखरावर हा सजल नीलवर्ण नूतन मेघ आला आहे डोंगराच्या तटाशीं दांतानीं खेळतानां अंगावर तांबुस माती उडून जसा मत्तहत्ती शोभतो त्या प्रमाणें हा सूर्य-किरणांनीं सांमत आरक्त दिसत आहे तर यालाच आपल्या प्रियेकडे निरोप घेऊन जाण्याकारितां विनंती करून त्यास मार्ग दाखवून द्यावा. ( हात जोडून ) हे मेघराजा—

पद. चाल. परमसुवासिक.

**थोर कुलामधिं जनु तव झाला हरिदूतामधिं तूं असती ॥ कामरूपधर संतत्पाचा सर्व ताप तो निवारिशी ॥ परोपकारी किती तूं जीवन देशी साऱ्या जगतासी ॥ ह्मणुनी कांहीं विनंती तुजला वाटे मजसी करावीसी ॥ विफल याचना झाली तरिही बरवी थोरांपाशीं ती ॥ नको नको परि नीचा जवळीं जरि मोठें ये फल हातीं ॥ १ ॥**

हे मेघराजा, स्त्रीविरहदुःखामुळें मी अति व्याकुल झालों आहे तर जिच्या प्रासादांतिल गच्यांवर श्री शंकराच्या जटा-मुकुटावरील चंद्राचे किरण पडून त्या चकाकत आहेत अशा

~ लकावतीवरून तुझा मार्ग जातो तेव्हां मी तुला कांहीं निरोप सांगतों तो तूं माझ्या प्रियेला कळीव. कारण, फुलापेक्षांही ज्यांची हृदयें कोमल आहेत त्या स्त्रियांस पतिवियोग झाला असतां एक आशा मात्र त्यांचें संरक्षण करिते यासाठीं श्रीरामचंद्राचे चरण लागून ज्याचे तट पवित्र झाले आहेत असा तुझा सखा जो हा रामगिरी त्याला आलिंगन देऊन माझें कुशल वृत्त माझ्या प्रियेस कळवण्याकारितां जा. तूं आपल्या मार्गानें जाऊं लागलास म्हणजे—

पद. चाल. अर्जुन तर संन्यासी.

पथिकांच्या कामिनि निज पांडुर वदनावरुनी ते ॥
मागें सारुनि विसकटलेले कच बघतिल तूंते ।
आला वर्षाऋतु आतां पति येतिल सदनाते ॥
पूर्वानुभवें आश्वासन त्या देतिल स्वमनाते ॥
॥ चाल ॥ मंदमंद मारुत नेइल तुज वाहुनी ॥
स्तव चातक पक्षी करिलचि बहु तोषुनी ॥
गर्भधारणा करावयाच्या जाणुनि समयाते ॥
उंच बलाका येतिल गगनीं तुज भेटायाते ॥ १ ॥

आणखी मेघराजा—

दिंडी.

ा तव चंड वेग साचा ॥ बघुनि जाइल तो
ाजांचा ॥ मुकुट हरिला शोभला शिखि
॥ भास तुजवरि होईल इंद्रधनुचा ॥१॥

आतां तुला मी मार्ग दाखवितो त्याप्रमाणें तूं जा-
अगोदर ज्या क्षेत्रपालिकांचे श्रम सफल होणें
र अवलंबून आहे त्या तुला आनंदानें पाहतील
र माळावर राहून पुढें निघ. नंतर—

पद. चाल. मजवरि हें आलें.

ठरांनीं ॥ त्वां शमवीला ॥ जलवृष्टी क-
कृतज्ञ तरितो आम्रकूट गिरि धरिल
ां निज शिखरांनीं ॥ त्याचे तट गेले ॥ सह-
ां ॥ आच्छादुनि सगळे ॥ तुझिया संबंधा-
ार नीलवर्ण मग दिसेल झालें ॥ १ ॥

ा, यामुळें तो आम्रकुटगिरी पृथ्वीचा स्तनच आहे
सा आकाशसंचारीं प्राण्यास भास होईल मग—

ज्या युवती ॥ यत्कुंजवनीं ॥ क्रीडा करि-

ताती ॥ त्या गिरीशिखरीं क्षणभर वसुनी घेई आनंदें विश्रांती ॥ ३ ॥

मग तेथून निघालास ह्मणजे पुढें विध्यांद्रीच्या कड्यांतून खालीं पडत असलेली नर्मदानदी तुला लागेल तिचें तूं येथेच्छ जल प्राशन केल्यावर तुला इतकें गुरुत्व येईल कीं वायूला मुळींच तोलून धरितां येणार नाहीं. तुझी भयंकर गर्जना ऐकून सिद्धस्त्रिया भीतीनें पतीच्या गळ्याला मिठ्या मारतील आणखी—

## साकी.

केकारव तव सत्कारास्तव करितिल नंतर मोर ॥
अद्रिअद्रिनीं कुटजांचाही परिमल सुटेल थोर ॥
त्यामधिं गुंतोनी ॥ जा नच स्मृति मम वि
सरोनी ॥ १ ॥

त्यापुढें मेघराजा, दशार्ण नामक प्रदेशांत तुझें गमन होईल.

### पद. रागमालकंस.

विदिशा नगरी त्या प्रांताची ॥ सुराजधानी आहे साची ॥ धृ. ॥ तेथें जाता खचित सफलता होइल तुझिया कामुकतेची ॥१॥ कमलसुगंधित

**वेत्रवतीच्या गोडी घेशिल मधुर जलाची ॥ जवळील क्रीडा पर्वति जातां बघशिल सदनें नव गणिकांचीं ॥ आगमनें तव मुकालित होतिल त्या-परि सुमनें कदंब तरुची. ॥**

मेघा, त्या वेत्रवती नदीसभोंवतीं जाईजुईचे ताटवे आहे त्यावर जीवन वर्षून त्यास टवटवीत कर व फुलें वेचून उन्हा-मुळें ज्यांचीं मुखें लाल झालीं आहेत व गाल ओले झाले आहेत व स्वभावानें ज्या अगदीं भोळ्या आहेत त्या माळिणींना घटका-भर सावली देऊन शांत कर. तेथून पुढें जाताना—

पद. रागवसंत.

**उत्तरेस जी उज्जनि आहे ॥ बघण्या वांचुनि तीनच राहे ॥ भूवरि केवळ अमरावति ती ॥ तेथिल चंचल नयना युवती ॥ विलोकिती नच रिझशिल वाटे विफल जनन तव झालें पाहे ॥ १ ॥ बैसुनि सुंदरी सौधावरती ॥ क्षिप्रावातें श्रम परिहारिती ॥ तच्चरणाही रंगित भूवरि विश्रम होई नच विसरें हे ॥ २ ॥**

मेघराजा, या प्रमाणें तेथील मौज पाहून नंतर—

## साकी.

महाकाल जो त्रिभुवनपति त्या जाई वंदायाते ॥
तत्प्रभातपूजासमयीच्या करि दुंदुभिकार्याते ॥
तेथिल गणिकासी ॥ जल वर्षुनि दे हर्षासी ॥ १ ॥

मेघा, तेथें तूं असतांना तुला अशि विनंति आहे कीं—

## अंजनीगीत.

अंधकार तो पडता तरुणी ॥ जातां चोरुनिया प्रियसदनीं ॥ नच मोठ्यानें तूं गर्जोनी ॥ भेडावी त्यांना ॥ १ तरि चपलेची दिवटी करुनी ॥ मार्ग दाखवी मधुनीमधुनी ॥ कोठें तरि श्रम घे परिहरुनी ॥ चपला स्त्रीसंगें ॥ २ ॥ त्यापरि टाळुनिया संकेता मनोभंग तो केला असता ॥ निजपतिवरती रुसुनी वनिता ॥ अहोरात्र बसती ॥ ३ ॥ समजाया मग त्यालागोनी ॥ सकाळि तत्पति जातिल सदनीं ॥ काळोखा नच लांबवि ह्मणुनी ॥ त्याकाळीं मेघा ॥ ४ ॥

नंतर प्रात:काळीं तेथून निघालास म्हणजे पुढें तुला गंभीरा

नांवाची नदी लागेल. तिच्या अंतरंगांत तुझें सुंदर रूप प्रतिबिंबित झाले असतां तिनें आपल्या हृदयांतच तुला साठवून ठेवले कीं काय असा भास होइल. तर मेघा, तिजबरोबर थोडा विनोद करून तिचा मनोरथ सफल केल्याशिवाय राहूं नकोस. मग अंजिरांना पिकविणारा वायू तेथून तुला देवगिरीवर नेईल. त्या ठिकाणीं—

## पद. चाल. वीर शिरोमणि.

सुरसेनेचा नायक होण्या पशुपतिनें निर्मिला ॥ तो गुह त्याठायीं राहिला ॥ ज्याचें उज्वल तेज पाहुनी दिनमणिही लाजला ॥ जो ब्राह्मण्यद जाहला ॥ चाल ॥ तत्पूजेसाठीं तनु कुसुमांची धरी ॥ मग वर्षुनि सुमनें त्या सुखवी अंतरीं ॥ चाल ॥ जेणें हर्षुनि तच्छिखि नाचे करि रव ऐसा भला ॥ गिरिगुहेंतही जो नादला ॥१॥

मेघराजा, तेथून पुढें तूं उत्तर दिशेस निघालास म्हणजे आपलीं वाद्यें भिजतील या भयानें गंधर्व तुला पाहून दूर होतील. नंतर रंतिदेव राजाची कीर्तीच अशी चर्मण्वती नदी तुला लागेल. तिच्या पांडुरवर्ण प्रवाहांत तुझा कृष्णवर्ण देह प्रतिबिंबित झाला म्हणजे—

## साकी.

सुंदर ऐसा इंद्रनील मणि ज्यामधिं चमके थोर ॥ भूदे-
वीनें घातलाचि हा काय सुमुक्ताहार ॥ गगनांतुनि ब-
घतां ॥ गमेल सिद्धांच्या चित्ता ॥ १ ॥

तेथून पुढें दशपुरनामक नगरावरून तुझें गमन ब्रह्मावर्त नामक देशांत होईल. व पुढें अतिविख्यात असे जें कुरुक्षेत्र ते तुला लागेल. त्या ठिकाणीं कौरव पांडवाच्या युद्धांत अगणित राजे अर्जुनानें मारले आहेत. त्यावेळी पक्षपात टाळण्याकरितां जिच्यांत रेवतीचे नेत्र बिंबले आहेत अशी मधुर सुरा पान कर-ण्याचें टाकन बळराम तीर्थयात्रेच्या मिषाने ज्या सरस्वतीच्या तीरीं गेला ती सरस्वती नदी मेघा तुला पुढें लागली असतां तिचें उदक प्राशन कर ह्मणजेजरी तूं वरून काळा आहेस तरी त्या पुण्यानें अंतरी शुभ्र होशील. मग तेथून कनखल नामक तीर्थावरून तूं पुढें गेलास ह्मणजे हिमगिरीवरून खाली पडत असलेली भागिरथी नदी तुला दिसेल. पहा—

## दिंडी.

कपिलशापें हत सागरांस जी कीं ॥ मार्ग झाली जावया
देवलोकीं ॥ करी क्रीडा शिवशिरीं ती बसोनी ॥
कोप गिरिजा धरि परी त्या न [illegible]नी ॥ १ ॥

आणखी पहा—

## साकी.

गगनांतुनि सुरगजापरी त्या सुरनदिचें जल पीता ॥
तूं त्यामधिं तव सावलि पडुनी नवलचि होइल जगता ॥
गंगायमुनेचा ॥ संगम अस्थानीं साचा ॥ १ ॥

नंतर मेघराजा, पुढें त्या हिमालय पर्वतावर तूं जाऊन विश्रांती घे व असे कर कीं—

## पद. चाल. निष्कारण हंसतांना.

कस्तूरी मृग बसुनी जेथें शिलासुगंधित होती ॥ कर्पूराच्या राशीसमतत् शिखरें हिम वर्षीती ॥ उमटलि पार्वतिसह शिव फिरता तेथें पदें तयाचीं ॥ त्यांना वदन करुनी घाली प्रदक्षिणाही साची ॥ किन्नरनारी त्रिपुरविजय मग गातांना आनंदें ॥ मृदंगकार्यचि करि तूं त्यांचें गुहेंत अपुल्या नादें ॥ १ ॥

मेघराजा, या प्रकारें त्या गिरिराजाचें यश गाऊन यथासांग करून तूं पुढें गेलास ह्मणजे परशुरामानें आपल्या प्रखर बाणांनीं ज्याला भोकें पाडून हंसाना इकडे येण्यास मार्ग केला तो क्रौंचगिरी तुला लागेल व त्या नंतर—

## पद. चाल. पूर्वी अधरोष्टावरि.

वीर्यमदानें दशाननानें पूर्वी हालविलें ज्यासी ॥ शृंगें सुधवल तैसीं ज्याचीं जाउनि भिडली गगनासी ॥ सुरनारींचा विशाल निर्मल आदर्शचि जणु जो दिसतो ॥ शुभ्रवर्ण कैलासगिरी मग अवलोकन तूं करशिल तो ॥ तेथें क्रीडेस्तव पार्वतिसह येइल शिव तो मणिशिखरीं ॥ त्या दंपतिची सेवा करुनी कृतार्थ अपुला जन्म करी॥१॥

मेघा, त्याठिकाणीं क्रीडारंगांत मत्त झालेल्या सुरस्त्रिया ऊष्णकाळीं तुला पहातांच तुझ्यांतून कारंजाप्रमाणें धारा पडाव्या ह्मणून आपल्या कंकणाच्या अग्रांनीं तुला टोचतील. तर त्यांच्या हातून सुटण्याकरितां तूं मोठ्यानें गर्जना कर. मग ज्यांत सुवर्णकमलें होतात त्या मानससरोवराचें जल प्राशन करून मनांत तृप्त होत्सातां तेथून दूर अंतरावर—

## दिंडी.

बसे संगोत्सुक पतीसवें युवती ॥ तशी कैलासा लगटुनी असे ती ॥ जवळ मंदाकिनि सुप्रवाह वाहे ॥ अशी अलकावति लोचनांनिं पाहे ॥ १ ॥

भग मित्रा, त्या अलकावतींत जाऊन तूं तेथली मजा पहा. त्या नगरीचें मी किती वर्णन करावें! ज्यांचीं शिखरें गगनांत गेली अशा तिच्यांतील प्रासादांनीं तर तुझीच बरोबरी केली आहे पहा—

### पद. चाल. जो जिंकुनि पांचजणांसी.

तुजपाशीं वसते चपला ॥ त्यामधिं सुंदर फिरती बाला ॥ धृ० ॥ विचित्र हरि धनु तुजवरि शोभे रंग तसा त्यानां दिधला ॥ १ ॥ तवगंभीर ध्वनिपारि तेथें नाद मृदंगाचा घुमला ॥ २ ॥ प्रतिबिंबग्राहक तन्मणिभू तु-लते तव जलशरिराला ॥ ३ ॥

मेघराजा, त्याठिकाणीं पहा केवढा चमत्कार आहे कीं—

### साकी.

विलासिनी करिं कमळें त्यापरि कुंदकळ्या शिरिं ध-रिती ॥ लोध्रांनीं ये मुखि पांडुरता शिरीष कर्णीं दिसती॥ केशीं कुरबकही ॥ भांगीं नीपफुलें पाही ॥ १ ॥

तसेंच—

### श्लोक. कामदा.

फुलुनि तरु वरी मधुप गुंगती ॥ नलिनि विकसुनी नित्य

डोलती ॥ पंख उभारुनीं मोर नाचती ॥ भूमि शशिकरें विमल भासती ॥ १ ॥

आणखी, त्या ठिकाणीं तुला असें विलक्षण आढळेल कीं—

## दिंडी.

प्रेम कलहाविण दुजा कलह नाहीं ॥ वयचि तारुण्याविण न तया ठायीं ॥ तसा स्वच्छंदें निवारावयाचा ॥ एक कामज्वर मात्र असे साचा ॥ १ ॥

मेघराजा, त्या माझ्या अलकावतींत ज्यांच्या गच्च्यांत ताराबिंबन फुलें पसरल्या सारखा भासहोतो तेथें यक्ष स्त्रियांसह आनंदानें मधुर मद्यें प्राशन करीत असलेले तूं पाहशील व शिवाय अशी मौज तुला दिसेल कीं—

पद. चाल. नाहीं कोणी हुंगीलेंही—

कल्पतरूतळिं गंगातीरीं ॥ किन्नर कन्या खेळति बहुपरि ॥ कनकवाळुमाधिं रत्नें लपविति ॥ कोणी यत्नें तीं शोधीतीं ॥ गांठ सैल ती निरिची होतां ॥ शालू पतिनें कारि ओढितां ॥ रत्नदीप लाजुनि विझवाया ॥ गुलाल त्यावरि टाकिति वाया ॥ २ ॥ क्रीडा-

रंगीं अंगें उवता ॥ त्यांसी येण्या मग शीतलता ॥ चंद्रकांत मणि हार घालिती शशिकिरणीं ज्या पाझर सुटती ॥ ३ ॥ वेणीमधुनी कुसुमें गळती ॥ माला तुटुनि विखरती मोतीं ॥ धनद्स्तुतिपर गायन करि-ती ॥ अखंड लक्ष्मी तेथें वसती ॥ ४ ॥

मेघा, कुबेर मित्रास्तव त्या अलकावतीत निरंतर श्री शंकराचा वास असल्यामुळें तेथें मदनास आपले धनुष्य सज्ज करिता येत नाहीं पण त्याचें काम स्त्रियांचें नेत्र कटाक्षच करितात. अशा त्या नगरींत मेघराजा, कुबेराच्या गृहाच्या उत्तरेस नाना रत्नांनीं मंडित असें जें मोठें मंदीर तुला दिसेल तेंच माझें समज. त्या मंदिरांत—

## पद.

सुवर्ण कमलें ज्यामधिं शोभति ऐसें आहे क्रीडेचें ॥ एक तळें जें ठिकाण झालें मानस सोडुनि हंसांचें ॥ जवळी क्रीडापर्वत त्याचें चकाकते शिर नीलांचे ॥ मधुमालतिमंडपासभोंवति गुलाब फुलले बहु साचें ॥ एक

बकुळिचा दुसरा विलसे अशोक तरु बहु शोभेचा ॥ प-
हिला सखि मुखमदिरा वांछी दुसरा घातचि चरणाचा॥ १॥

मेघराजा, अशा त्या माझ्या मंदिरांत क्रीडापर्वतावर जाऊन तूं आंत अवलोकन कर ह्मणजे—

पद.

चंपकवर्णा चंचलनयना तें सडपातळ अंग असे ॥
कुंद कळ्यापरि दंतचि शोभति ओंठ बिंबफल लाल
जसें ॥ कनकलतेला पुष्पगुच्छ कुच भासति त्यापरि
उरावरी ॥ गजगति चाले भाषण कितितरि मंजुल तैसें
हितकारी ॥ यद्रूपाला रूप उतरलें नाहीं विधिच्या
हातोनी ॥ प्राणचि केवळ मम शरिराचा बघशिल अ-
पुली अशि वहिनी ॥ १ ॥

परंतु मित्रा, या वर्षाकाळांत त्या माझ्या प्रियेची मी जवळ नसल्यानें तुला कशी अवस्था दिसेल पहा—

पद. चाल. पांडुनृपति.

हिमयोगें नलिनी जशि ॥ क्षीणांगी झाली अशी ॥

सुज आली नयनासी ॥ रोदनामुळें ॥ १ ॥ सोडुनि बहु-
सुस्कारे ॥ ओष्ठांचा रंग फिरे ॥ ठेवुनियां गाल करीं ॥
काळजी करी ॥ २ ॥ तूं शशिला झांकितांचि ॥ तेज
हीन होय तोचि ॥ म्लानपणा दिसतोची ॥ तन्मु-
खावरी ॥ ३ ॥

आणखीं पहा—

## साकी.

वियोगादिन मम कळण्या प्रतिदिनीं कुसुमें मांडुनि
मोजी ॥ मानससंगें परमानंदीं निमग्न बहु झाली जी ॥
अथवा मजविषयीं ॥ गीतें रचुनी ती गाई ॥ १ ॥

मित्रवरा, अशी ती माझी प्रिया, गृहकृत्यें करून दिवस कसातरी लोटील पण माझा विरह रात्रीं तिला फारच असह्य होइल. यासाठीं तूं मध्यरात्रींचेवेळीं त्या ठिकाणीं जाऊन तिला माझा निरोप कळीव. त्यावेळीं ती—

## दिंड्या.

करित तळमळ भूवरी असे निजली ॥ आठवुनि मज-

लोचनीं अश्रुढाळी ॥ क्षणापरि मम संगतीं होय चित्ता ॥ युगापरि ती होईल रात्र आता ॥ घडो स्वप्नीं मम भेट ह्मणुनि घेई ॥ झोंपउत्सुक होउनी परि न येई ॥ गवाक्षांतुनि चंद्रिका उठुनि पाही ॥ पुनः संतापें आंत परत जाई ॥ १ ॥

आणखि मेघा, वियोग दिवशीं जी तिनें वेणी घातली होती ती फिरून माझा शाप संपून मी भेटल्यावर घालावयाची असा तिचा निश्चय असल्यामुळे ती तशीच सुटलेली व तैलादिक न लाविल्यामुळें मळलेली तुला दिसेल. आतां जिला मुळीं न्हाणच नाहीं तिच्याठायीं अलंकाराची वार्ता कशास पाहिजे? ती तिची तशी स्थिती पाहून तुझ्या नेत्रांवाटे तर खळखळ अश्रुधाराच वाहूं लागतील. मी हें अतिशय स्त्रैणत्वामुळें बोलतों असें तुला वाटत असेल तर खरोखरी असा प्रकार आहे कीं नाहीं हें तूंच पहा. तूं तेथें गेलास ह्मणजे तिचा वामनेत्र स्फुरण पावेल नंतर ती जर निद्रिस्थ असेल तर कांहीं काळ वाट पाहून मग तिला आपल्या जातिकुसुमजलकणांनीं जागी कर. तुला खिडकींत आलेला पाहून प्रथम ती चकीत होईल तर तिला अश्वासून असें सांग कीं—

## साकी.

पतिव्रते मी जिवलग मित्रचि आहे गे तव पति-चा ॥ आलों येथें सांप्रत तुजला निरोप घेउनि त्या-चा ॥ परोपकाराचें ॥ धरिलें कार्य शिरीं साचें ॥ १ ॥

मेघराजा, हें तुझें भाषण ऐकतांच ती मोठ्या उत्सुकतेनें सीतादेवीनें जसा मारुतीचा सत्कार केला तसा तुझा करील; कारण विरहिणी स्त्रियांस पतिची गांठ व निरोप सारखेचि प्रिय आहेत. नंतर मित्रा, तूं तिला असें सांग--

### पद. चाल. मजवरितरु ही.

रामगिरीवर तव पति राहिला असे ॥ तूं खुशाल अससी नां जाण पुसतसे ॥ वाळशि तूं जाशि तदंग होय कृश तसें ॥ विरहाग्नी तुजपरि त्या दहन क-रितसे ॥ न खळे तव नेत्रांचें नित्य जल जसें ॥ खरो-खरी स्थिति त्याची तेंवि होतसे ॥ उत्कंठा दोघांही सारखी दिसे ॥ आलिंगी स्वप्नें तुज दूर जरि वसे ॥ १ ॥

हे पतिव्रते, त्याला इकडे येतां येत नसल्यामुळें तुझ्या अति प्रेमास्तव मज मुखानें तुला असें सांगत आहे कीं—

## पद. चाल. विलासिनी गेली ही.

वेली मधिं मज तवांग भासे ॥ शिखिपंखामधिं कच भार दिसे ॥ दिसती मृगशिशु जवळीं डोळे ॥ नदि लहरी मधिं भृकुटीचाळे ॥ लावण्यशशीबिंबीं अढळे ॥ मंद गती तुझि करिमाधिं विलसे ॥ १ ॥ यापरि नयनीं बघतों कांहीं ॥ पूर्ण असे परि कोठें नाहीं ॥ चित्रशिळेवरि काढुनि पाही ॥ अश्रुजलें होय दिसेनासें ॥२॥

प्रिये, आपलें दैव किती निष्ठुर कीं मी तुला स्वप्नांत पाहून तुला कवळावयास आकाशांत हात घालतों पण तोहीं माझा मनोरथ पूर्ण होत नाहीं. माझा विलाप ऐकून वनदेवताही अश्रू ढाळितात. आणखीं प्रिये, हिमाचलावरून येणारा वायु तुझ्या स्पर्शाचा असेल ह्मणून त्याला आलिंगन देतों- काय करूं ही लांब रात्र क्षणासारखी कधीं होईल व दिवसाची उष्णता कशी नाहींशीं होईल याचा विचार करण्यांत अर्थ नाहीं हें मी जाणतो पण दुःख सोसवत नाहीं. असो. पुढील सुखाच्या आशेवर मी धीर धरून आहे आणि तूंही शहाणी आहेस. या जगांत निरंतर सुखी कोण आहे याचा विचार करून तूं आपल्या मनाचें समाधान कर. तुला माहितच आहे

कीं, कार्तिकमासीं माझा शाप संपतो आहे तर तोपर्यंत डोळे मिटून दिवस काढ. नंतर आपल्या मनांतले सर्व कोड पुरवूं—

## दिंडी

मिठी मारुनि मग गळां नीजशील ॥ सखे अवचित मधिं रडत उठशील ॥ कशी स्वप्नीं त्वां सवत असे केली ॥ मला वदशील गे हांसुनिया गालीं ॥ १ ॥

आणखी प्रिये जनवार्तेनें संशयांत पडून मजवरचा विश्वास उडवूं नकोस. कोणी ह्मणतात दूर राहिल्यानें प्रेम कमी होतें पण मी अनुभवानें खचित सांगतों कीं, तें कमी होत नाहीं पण अधिक होतें. हे मेघराजा, वियोगानें पीडित अशा माझ्या सखीला असा माझा निरोप सांगून मजसाठीं तिचा उलट निरोप व खूण घेऊन ये. तूं कधीं येशील याची मी वाट पहात बसतों. मित्रा, मेघा, हे माझें कार्य जें तूं अंगीं-कारीत आहेस तें केवळ आपल्या परोपकारी स्वभावामुळेंच असें समज. तुला हें कार्य सांगणें अयोग्य आहे हें मी जाणतों पण काय करूं माझा निरूपाय आहे. हें माझें कार्य तूं पूर्ण करून आलांस ह्मणजे—

## अंजनीगीत.

नंतर क्रीडा करावयाला ॥ जाई आवडत्या स्थाना-
ला ॥ चपला स्त्री तव तीचा तुजला ॥ विरह न कधिं
होवो ॥ १ ॥

जा आतां. ( पाहून ) अरे वः हा तर निघाला. आतां येथेंच याची वाट पहात आपण बसूं. ( शुद्धीवर येऊन ) अरेरे! पण हें मी काय केले! मला वेड तर नाहींना लागलें शिव शिव! प्रियेच्या विरहानें मी अगदीं वेडा झालों—

## साकी

एकवटुनिया वारी वायू तेज धूम जो झाला ॥
अचेतन असा मेघ कसा हा निरोप नेइल तिजला ॥
परि मज नच्च कळलें ॥ भलभलतें त्या सांगितलें ॥ १ ॥

( मूर्च्छीत पडतो व वनदेवता प्र. क. )

**वनदेवता**—त्या यक्षाचा शोध करीत मी। येथें आले पण तो येथें कोठें दिसत नांहीं ( पाहून ) हाच तो, पण हा असा

मूर्च्छींत कांबरें पडला आहे ? आणि हा काय चमत्कार ! माझ्या कन्येच्या गळ्यांतली रत्नमाला याच्या कंठांत कशी आली ? याला सावध करून काय प्रकार तो समजून घेतला पाहिजे.

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा. वनदेवतेचा आश्रम.

( आसनस्थ वनदेवता व चूडामणी बसले असून जवळ एक पुरुषाचा व एक स्त्रीचा असे दोन मृतदेह आहेत. )

**वनदेवता**—वत्सा, याप्रमाणें वर्तमान घडल्याला आज एक तप झालें आहे. केवळ परोपकार बुद्धीनें मी यांच्या देहांचें रक्षण आजपर्यंत केले पण अजून ते परत येत नाहींत. त्यांच्या शोधा करितां अलकावतीहून कोणी येथें येईल अशी मला आशा होती पण ती देखील व्यर्थ झाली. आतां यक्षपतीच्या शापानें तूं दुःख भोगण्यास जरी येथें आला आहेस तरी त्या पासून मला आनंदच होत आहे. असो आतां हा तुझा शाप संपल्यावर तूं विदर्भ नगरींत जा व कसें ही करून त्या

उभयतांस येथपर्यंत घेऊन ये ह्मणजे पुढील कार्य भाग मी करिते. तूं त्यांस येथे घेऊन आलास म्हणजे त्या योगानें मजवर त्या अमात्यावर, यक्षपतीवर व आमात्याच्या कुटुंबावर तूं मोठा उपकार केलास असें होईल.

**चूडामणी**—हाय हाय ! देवा ! मी केवढा तरी भयंकर पाप कर्मा ! आतां माझी काय दशा होणार ?

**वनदेवता**—अरे, हें अमात्याचें वर्तमान ऐकून तूं दुःखित का झालास व असें काय भलभलतें बोलतोंस ?

**चूडामणी**-हे देवी, तुला मी काय सांगूं ?

**पद. चाल काय मला भूल.**

हा अमात्य इंद्रसेन तात मम तरी ॥ इंदुमती ही जननी जाण अंतरीं ॥ धृ० ॥ अवचित हे गेले कधिं मला सोडुनी ॥ तत्शोधास्तव धुंडिली सकल मेदिनी ॥ परि ठिकाण कोणाचा मज न लागुनी ॥ आज देह त्यांचे मी बघे भूवरी ॥ १ ॥

**वनदेवता**—असें काय ? एकूण तूं यांचा मुलगाच तर. असो. पूर्व प्राक्तनामुळें आजपर्यंत तूं येथें असून तुझी व त्यांची भेट

ी नाहीं. पण आतां तुझ्याच हातून ते पुनरपि पूर्व रूपास
ाचा योग आला आहे तर यांत दुःख न मानता उलट
ादच मान.

**चूडामणी**—हे देवी, आज मातापितरांच्या शरीरांचें
न झाले येणें करून मला परमानंद झाला आहे. व आतां
ा शाप संपताच मी कसेंही करून त्यांस पूर्व रूपांन आण-
शिवाय रहाणार नाहीं. पण तुझें सर्व भाषण ऐकून मला
ुःख झाले त्याचें कारण निराळेंच आहे व ते परिहार कर-
ण्याचाही सांप्रत कोणता मार्ग राहिलेला नाहीं.

**वनदेवता**—वत्सा, असें दुःख यांत तुला कोणतें झालें ?

**चूडामणी**—शिवशिव ! तें तुला काय सांगू ?

**पद.** चाल दीन जनांचा कल्पतरू.

त्रांगद भूपति तत्भार्या अहिदंशे मेले ॥ तत् शरिरासी
ारूप मम जनानिजनक झाले ॥ १ ॥ सांप्रत त्यांची
र कन्या मनमोहिनि जी गे ॥ गांधर्वाच्या विधिनें
न मी वरिलें अनुरागें ॥२॥ परि ती भगिनी मी तत्बंधू
आतां झाले ॥ वर्तमान तूं या परि कैसें दुःखद
ंविलें ॥ १ ॥

आतां हें वर्तमान माझ्या मात्यापित्यांस कळल्यावर ते खचित माझा धिःकार करतील. भगिनी व मित्र माझें मुखावलोकन करणार नाहींत व आधींच तिला वरल्यामुळें मजवर रागावलेल्या यक्षपतीस हा आमचा अशास्त्र संबंध पाहतांच संताप येऊन ते मला यक्षयोनीतूनदेखील च्यूत करितील. हे सारेंही अनर्थ मी सहन करीन; पण—

पद. चाल. धाडुनि दिधलें.

विपरित परिणय घडलेला हा कळता त्या सुंदरिला ॥
मज कथवेना अनिवार कसे होइल गे दुःख तिला ॥
ती मानी बहु नच कोणाच्या साहिल अपमानाला ॥
निःसंशय मग वाटे करिलचि स्वप्राणत्यागाला ॥ सुख
पुढें नसे मुळिं या लोकीं तिज वांचुनि बघ मजला ॥
भाग पडेलचि कसा तरी तो शेवट करणें अपुला ॥ १ ॥

( असें ह्मणून शोकाकुल होतो. )

**वनदेवता**—वत्सा, सावध हो. जरी ती तुझ्या पित्याचीच कन्या आहे तरी हें सर्व नात्यांचे संबंध देहाला अनुलक्षून आहेत जीवाला नाहींत असें शास्त्रवचन मी पुष्कळ ऋषींच्या मुखांतून ऐकलेलें मला आठवत आहे; तर तूं इतक्यांतच असा दुःखांकुल

होऊं नकोस. तुझें मातापितर पुनः आपल्या स्वरूपाप्रत आले ह्मणजे मग त्याचा कांहीं तरी निर्णय करतां येईल.

**चूडामणी**–हे देवी, तसें झाले तर मात्र मजसारखा भाग्यवान् कोणी नाहीं. आतां त्यांची भेट होई पर्यंत मला कसें तरी आपले समाधान केलें पाहिजे.

**वनदेवता**–बरे, वत्सा, तुला एक गोष्ट विचारावयाची आहे. तुझ्या गळ्यांत जी ही रत्नमाला आहे ती तुला कोणा पासून प्राप्त झाली ?

**चूडामणी**–हे देवी, ही रत्नमाला सदोदीत माझ्या प्रियेच्या कंठातली आहे. ही तिला जन्मतांच प्राप्त झाली असून ती कशी प्राप्त झाली हे तिला मुळींच माहीत नाहीं. तिला सोडून मी इकडे येते वेळीं आपली अठवण राहावी ह्मणून तिनेंही प्रेमानें माझ्या गळ्यांत घातली.

**वनदेवता**—वत्सा, तर मग तुला काळजी करण्याचें आतां कांहींच कारण राहिले नाहीं ?

**चूडामणी**—देवी, असें कशावरून तूं ह्मणतेंस ?

**वनदेवता**—अरे. ती तुझी स्त्री त्या राजाची कन्या नसून माझीच कन्या आहे हें मी या मालेवरून जाणले.

**चूडामणी**—काय तुझी कन्या ? ती कशी ?

**वनदेवता**—वत्सा, ऐक. तुला सर्व सांगतें. मी कुमारपणांत असतानां माझें रूप पाहून भगवान् सहस्ररश्मी मोहीत झाला व त्यानें मजबरोबर संगमसुख भोगून माझ्या कौमार्याचा भंग केला. त्याप्रसंगानें पुढें मला गर्भ राहून ही अनुपम सुंदर अशी कन्या झाली असतां दुष्कीर्तीच्या भयानें मी तिचा लोभ सोडून तिला एका पेटींत घालून दिनमणीनें प्रेमानें आपल्या कंठांतली मला दिलेली ही दिव्य रत्नमाला तिच्या गळ्यांत घातली व ही कोणास सांपडली असतां या मालेच्या लोभानें तो तिचें संरक्षण केल्यावांचून रहाणार नाहीं असें समजून त्या मालेसह तिला गोदावरीनदींत सोडून दिली. यावर आजपर्यंत तिचें वर्तमान मला कांहींच कळलें नाहीं. तरी या रत्नमालेवरून ती माझीच कन्या त्या राजास सांपडली असावी असें मला वाटतें.

**चूडामणी**—अहाहा ! देवी माझ्या प्रियेच्या जन्माचें हें विलक्षण वर्तमान ऐकून माझें सर्व दुःख नाहींसें होऊन मी आजच आनंदपर्वताच्या शिखरावर चढलों कीं काय असें मला वाटतें.

**वनदेवता**—वत्सा, तुज सारखा जामाता मला मिळाला

ही परमेश्वरानें मजवर मोठीच कृपा केली असें मला वाटतें. आतां यक्षपतीच्या शापातुन मुक्त झाल्यावर आपल्या मातापितरांस पूर्व रूपांत आणून तूं तिजसह चिरकाल आनंदांत रहा हा माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे.

**चूडामणी**—अहाहा ! हे देवी तुझे उपकार कितीतरी मी मानावेत—

## पद. चाल. मलिन वस्त्र.

या पंचमहा भूतापासुनि जननी जनकांची ॥ शरिरें मोठे श्रम सोसुनि तूं संरक्षिलि साची ॥ त्यापरि देउनि निज कन्या मज पूर्ण सुखी करिसी ॥ काय असे ती विधिची करणी नकळे कवणासी ॥ १ ॥

( असें झाल्यावर सर्व जातात. )

## अंक सहावा समाप्त.

# अंक ७ वा.

## प्रवेश १ ला. स्थळ. नाशीक पंचवटी.

( तदनंतर राजा चित्रांगद व राणी सुशीला प्र. क. )

राजा—प्रिये, श्रीरामचंद्रजींनीं जानकीसहवर्तमान ज्या ठिकाणीं वनवासव्रत आचरण केलें तेंच हें पंचवटीस्थान. पाहिलींसकां या ठिकाणीं कशी पवित्रता मूर्तिमंत वास करीत आहेती—

### पद. चाल. दिसती जों जों शैलांचीं ही.

यत्स्नानानें क्षणांत होतो लय पातकनिधिचा ॥ तो हा वाहे शांत पहा किति प्रवाह गोदेचा ॥ १ ॥ मोक्षप्राप्तीसाठीं इंद्रिय निग्रह करुनीया ॥ मुनि राहति हे वृक्षाखालीं आश्रम बांधुनिया ॥ २ ॥ तत्तपोबलें धेनू आणखि व्याघ्रादिक पशु ते ॥ एके ठायीं खेळति कैसे सोडुनि वैरातें ॥ ३ ॥

**राणी**—खरेंच प्राणनाथ, आपण आजपर्यंत अनेक क्षेत्रें पाहिलीं पण अशी रमणीयता मला कोठेंच आढळली नाहीं; तसेंच या ऋषींचें हें सामर्थ्य पाहिल्या पासून माझ्या मनाला असें वाटत आहे कीं आपणांसह निरंतर येथेंच राहून त्यांची सेवा करावी.

**राजा**—ठीक आहे. तुझ्याप्रमाणें माझ्याही मनांत तसेंच आलें आहे; या साठीं—

## साकी.

या पंचवटीमाधिं मुनि सेवनि कांहीं दिन घालवुनी ॥
मनमोहिनिचें वियोगदुःखचि जाऊं गे विसरूनी ॥
शिवाय जन्माची ॥ करुं ती सार्थकता साची ॥ १ ॥

पण प्रिये, आपण विदर्भनगरी सोडतांना राज्यांत जें जें कांहीं कमीजास्त वर्तमान घडेल तें तें कोणी सेवक पाठवून वरचे वर मला कळवीत जा असें सुमती प्रधानजींना मी सांगितलें असतां अद्याप त्याकडून कोणीच येत नाहीं. याचें काय बरें कारण? अथवा! कोणी येत नाहीं हें एकप्रकारें चांगलेंच आहे? कारण—

## पद. चाल. सुखचित्वनगुण ही.

त्या राज्याचा सांप्रत मजला ॥ वीट असे कीं पुरता आला ॥ तेथें जाउनि सुख सेवावें एसें वाटे नच या मतिला ॥ १ ॥ बसवुनि सिंहासनीं जामाता ॥ मग वनीं जावें सोडुनि चिंता ॥ हेतुचिहा मम होता परि तो दैवें आधिच घडवुनि अणिला ॥२॥ यावरि तीर्थाटन करुनीया ॥ धर्मकथा त्यापरि ऐकुनिया ॥ आयुष्याचा शेषभाग मी घालविण्याचा निश्चय केला ॥ ३ ॥

**राणी**--आपला हा जर निश्चय झाला आहे तर तो मला मान्य आहे माझी देखील कोणतेंही इहलोकींचें सुख आपणास असावें अशी इच्छा राहिली नाहीं.

**राजा**--शाबास! प्रिये, पतीच्या इच्छेप्रमाणें आपलें वर्तन ठेवणाऱ्या तुजसारख्या सद्गुणी स्त्रिया या जगांत फारच थोड्या असतील.

( इतक्यांत सुमती प्रधान प्र. क. )

**प्रधान**—राजाधिराजांचा विजय असो.

**राजा**—कोण ? प्रधानजी, आपणांस स्वतांच इकडे येण्याचें काय बरें कारण ?

**प्रधान**—सेवक पाठवून सांगणें बरोबर नाहीं असेंच कांहीं वर्तमान आपणांस कळविण्यास मला स्वतः यावें लागेल.

**राजा**—माझ्यामागें असें काय बरें विशेष वर्तमान घडलें ?

**प्रधान**—ऐकावें सरकार. आपण उभयतां तीर्थयात्रेला निघून गेल्यावर आपल्या आज्ञेप्रमाणें त्या राक्षस कन्येला आह्मी कारागृहांतच ठेविलें होतें. त्यांतून तिनें आपली सुटका व्हावी ह्मणून माझे पुष्कळ आर्जव केलें; पण मी त्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं; नंतर सुखप्राप्तीचा आतां कोणताही उपाय उरला नाहीं असें पाहून तिनें अन्नपाणी वर्ज्य करून आपल्या जीवित्वाचा शेवट करून घेतला. या गोष्टीस आज एक मास झाला.

**राणी**--काय ? प्रधानजी, ती राक्षसकन्या अशा भयंकर उपायांनीं आपला प्राण सोडिती झाली?

**राजा**—एकूण त्या दुष्टेनें मरतेवेळेस देखील आपल्या हट्टी स्वभावाची परिक्षा दाखविली अं. असो; प्रधानजी, त्या कृत्येचा अवतार संपला हें वर्तमान आज आपण सांगितल्यामुळें

मला फार आनंद झाला. असो. आणखी कांहीं माझ्या प-श्चात विशेष वर्तमान घडलें आहे काय ?

**प्रधान**—दुसरें कांहीं नाहीं त्या राक्षस कन्येनें प्राण सोडते वेळेस मला जवळ बोलाऊन आपणांस कांहीं सांगण्याविषयीं सांगितलें; व त्यासाठींच मी स्वतः आपणापाशीं आलों. ( असें ह्मणून राजाच्या कानांत सांगतो. )

**राजा**—मोठी आश्चर्याची गोष्ट आहे ही. ( राणीस ) प्रिये, प्रधानजीजवळ तिनें काय सांगितलें तें ऐक–

पद. चाल. नाहि सुभद्रा या वार्तेतेहीं

विदर्भपुरिं देवता असें मी कनिष्ट वर्णाची ॥ एके दिनिं मम निंदा केली राज्ञीनें साची ॥ धृ० ॥ ह्मणुनी मजला कोप येउनी सूड तिचा घ्याया ॥ महामाय राक्षसाधमाची होउनिया तनया ॥ रूपबलानें नृप मन भुलवुनि झाले तज्जाया ॥ दुःखें तिस त्याकडुनी दिधलीं भग नानापरिचीं ॥ १ ॥

**राणी**—अगबाई, काय हा चमत्कार तरी ! माझा छळ कर-ण्याकरितां देवताच सवतीच्या रूपानें आली होती अँ ? मग महाराजावर तिचा पूर्ण पगडा बसून त्यांनां मी नकोशी झाले

होते याबद्दल त्यांच्याकडे काय दोष ? बरं पण ही देवता कुठें आहे व इची मी निंदा कधीं केली ! मला तर कांहीं अ-ठवत नाहीं.

**प्रधान**-राणीसाहेब, वेशीबाहेर जे देऊळ आहे तें तिचेंच. हलक्या वर्णाचे सर्व लोक तिची पूजा करीत असतात. तिनें मरताना याप्रमाणें सांगून अखेरीस ' माझ्या सर्व अपराधाबद्दल राणीसाहेबाकडून मला क्षमा करवा ? असे मजजवळ ती मोठ्या काकुळतीने म्हणाली.

**राणी**—परमेश्वर तिला क्षमा करो. माझ्या मनांत ति-च्या संबंधानें मत्सरभाव असा मुळींच नाहीं.

**राजा**—पण कांहो प्रधानजी, तिचा भाऊ भयानक राक्ष-स सांप्रत कोठें आहे ?

**प्रधान**—ती एक मोठी आश्चर्याचीच गोष्ट आपणास सां-गावयाची राहिली. ती राक्षसकन्या मेल्यावर तिनें सांगितले-ल्या देवळांत एक दिवस मी कनिष्ठ वर्णाचे लोक तिची पूजा अर्चा कशी करितात हें बघण्या करितां गेलों असतां त्या ठि-काणीं ज्याच्या शरिरांत एक दिव्य बाण शिरला आहे असा तो भयानक राक्षस मृत झालेला असा मी पाहिला.

**राजा**— तर मग आपल्या राज्यावर पुढें मागें येणारें हे एक मोठें अरिष्टच टळलें ह्मणावयाचें. पण त्याला तपोबलानें अमरत्व प्राप्त झालें होतें व मायायुद्धांत तो निपुण होता असें असतां त्याला कोणी बरें मारलें ?

**प्रधान**—त्या संबंधानें कांहींच तर्क चालत नाहीं. आम्हीं राक्षस कन्येच्या अंत्यविधी प्रमाणें त्याचाही करून टाकिला.

**राजा**—प्रिये, मनमोहिनीचें त्याजबरोबर लग्न लावलें असतें तर आज केवढा बरं दुःखाचा प्रसंग येता—

## साकी.

तारुण्यामधिं तिजवरि येता प्रसंग वैधव्याचा ॥ कीं शेवट लागता करावा सति जाउनि जीवाचा ॥ तिजवर दैवाची ॥ होती पूर्ण कृपा साची ॥ १ ॥

**राणी**—पण तिनं सांगितलं तरी कसं खोटं पहा कीं त्यानें ब्रह्मदेवाची तपश्चर्या करून आपणाला अमर केलं आहे.

**राजा**—असो. प्रधानजी तुम्ही त्याची मरणोत्तर कोणाकडून विटंबना करूं दिली नाहीं हें फार चांगलें केले.

**प्रधान**—आतां, राजाधिराजाच्या चरणापाशीं इतकी

विनंती आहे कीं आज चार महिने तीर्थयात्रा केली ही पुरी झाली; आतां पुनरपि राज्यांत चलून उभयतांच्या दर्शनाविषयीं नागरीक जनांची मनीषा पूर्ण करावी.

**राजा**—छे, छे, प्रधानजी, तेवढें मात्र कधीं होणें नाहीं.

## पद. चाल. आकर्षुनी धनु.

निश्चय अमुचा सांप्रत झाला मोक्षप्राप्ती करण्याचा ॥
उपयोग न तो ह्मणुनी कांहीं होइल तुमच्या विनतीचा ॥
अधिकार असे तुह्मा दिधला त्या साऱ्या मम राज्याचा ॥ प्रजा सर्व तरि धर्मे पालुनि लोभाचि संपदा त्यांचा ॥ १ ॥

( पडद्यांत ) ' अहो पंचवटींत वासकरणारे सर्वलोक हो, आज एकाएकी गोदावरी नदीला महापूर आला आहे यासाठीं जर तुह्मास तुमच्या प्राणाची काळजी असेल तर जवळच्या रामगिरीच्या शिखरावर चढा; उशीर लावूं नका आतां इतक्यांत सर्वत्र जलमय होईल.'

**प्रधान**—राजाधिराज, राणीसाहेब, ही पहा कोणी पुढील संकटाची सूचना दिली तर लौकर चला या पर्वताच्या शिखरावर. ( राजा राणी प्रधान सर्व पर्वतावर चढतात. )

**राजा**—प्रिये, कोणत्यावेळेस काय प्रसंग येईल याचा नेम नाहीं एक घटकेपूर्वी ज्या पंचवटींत सर्वत्र आनंदमय दिसत होते त्याठिकाणीं सर्वत्र सांप्रत जलमय होऊन पहा काय प्रकार झाला तो—

## दिंडी.

सर्व आश्रम तरु उंचउंच तैसे ॥ महापूरामाधिं जाति बुडु-
नि कैसे ॥ ऐकु करुणारव येतसे जनांचा ॥ कोप त्या-
वरि बहु होय ईश्वराचा ॥ १ ॥

**राणी**—( आश्चर्यानें ) अगबाई, पण हें काय ? या पर्वतावर आल्यापासून मी कोण आहे व कुठें आहे याचेंच मला भान नाहींसे झालें आहे.

**राजा**—प्रिये, तूं ह्मणतेंस तसें मलाही वाटूं लागले—

## साकी.

मानव नच कीं आपण आहों कोणी तरि दुसरे गे ॥
मन्मनास हा प्रदेश बघता ऐसें वाटू लागे ॥ नकळे काय
असें ॥ मायामय कीं स्थल विलासे ॥ १ ॥

**प्रधान**—महाराज, राणीसाहेब हें आपण एकाएकीं असें काय भलभलतें बोलतां.

**राजा**--प्रधानजी, तुह्माला कांहीं येथें आल्यापासून विलक्षण वाटतें कांहो?

**प्रधान**—छे, मला कांहीं वाटत नाहीं. आपणाबरोबर मी मागें आलों होतों तेव्हां जसें वाटत होतें तसेंच वाटतें.

**राजा-राणी**--काय आह्मी येथें मागें आलों होतों?

**प्रधान** (मनांत) हे उभयतां असें काय करितात? (उघड) होय सरकार आणि त्यावेळींच आपणा उभयतांवरा भयंकर प्रसंग—पण नको तें.

(इतक्यांत वासंती वनदेवता येते)

**वनदेवता**—गोदावरीला मोठा पूर आला तो बघण्याकरितां आलें असतां विदर्भ नगरीचा चित्रांगदराजा व त्याची स्त्री सुशीला यांना दुरून पाहिले. प्रथम हा कदाचित् मला भास झाला असेल असें वाटलें; पण आतां खात्री झाली कीं तेच उभयतां, व जवळ प्रधानही आहे असो. आज गोदावरीच्या परानें सर्व लोकांचा जरी नाश झाला तरी तो मला उपकारच झाला असें वाटतें कारण त्यामुळें यांची गांठ पडली. पण हा काय च

मत्कार? राजा व राणी यांच्या सुखांत हे इतके गर्क झालेले दिसतात कीं यांना या ठिकाणीं देखील आपण कोण याची भ्रांति वाढत नाहीं असो त्यांना त्यांची ओळख देण्याला कितिसा उशीर पाहिजे? आतां जवळ जावें (राजाजवळ जाऊन विचारते )

**वनदेवता**—राजाधिराज व राणीसाहेब यांचा विजय असो. आपण इकडे कधीं आलां?

**प्रधान**—( मनांत ) ही बाई महाराजांशीं अगदीं ओळखिची असेलसें दाखविते ही कोण बरें? माझ्या कधीं पाहण्यांत नाहीं.

**राजा**—प्रिये, ही स्त्री ओळखीची दिसते पण कळत नाहीं.

**राणी**—होय महाराज मलाही असें होतें; हा कायबाईतरी चमत्कार आहे कळत नाहीं.

**वनदेवता**—तुह्मी दोघें असे स्तब्ध कां बसलांत. मला ओळखीत नाहीं का?

**राजा-राणी**—आपण कोण आहांत?

**वनदेवता**—याची देखील विस्मृति पडली कां? असो तर तुह्मांला चांगली आठवण करून दिली पाहिजे. ( असें ह्मणून राजाच्या व राणीच्या कानांत कांहीं सांगते )

**राजा**—शिवशिव ! कितीतरी मी अधम आहे मृत्युलोकच्या राजसुखास भुलून राजाधिराज कुबेर यांच्या कोपास पात्र झालों. ( राणीस ) प्रिये, तूं आलीस कां शुद्धीवर.

**राणी**—होय महाराज; आपणाप्रमाणें मलाही माझी ओळख राहिली नाहीं बारा वर्षे आपण मृत्युलोकांत राहून केवळ दुःख भोगून महाराजांचे पूर्ण अपराधी ठरलों. आतां मला देवी काय ह्मणेल ?

**राजा**—असो. झाल्यागोष्टीला उपाय नाहीं—

**पद. चाल. मलिनवस्त्र.**

जन्मांतरिचें पातक अपुल्या पदरीं बहु होते ॥ मध्यम लोकीं जाउनि आपण गे भोगियलें तें ॥ शाप बलानें यक्षदेव या ठायीं जनु घेती ॥ आपण होउनि परि आनंदें गति सेवियली ती ॥ निजरूपाची ओळख कैसी मुळिं नच राहिलि ती ॥ जगदीशाच्या मायेचें बघ किति बळ आहे तें ॥ १ ॥

**वनदेवता**—कां महाराज, अजून ओळख पटली कीं नाहीं ?

**राजा**—हे देवी, आम्ही मायेला वश होऊन तुला ओळ-

खलें नाहीं याची क्षमा कर आजपर्यंत तूं आमच्या देहांचें संरक्षण केलें हे तुझे उपकार आमच्या कडून कधीं फिटणार !

**वनदेवता**—बरं आतां विलंब कशासाठीं. अपुलापुत्र आपल्या दर्शनाची इच्छा करीत आहे.

**राजा-राणी**—काय ? चूडामणि येथें आहे !

**वनदेवता**—होय. आतां तो येथें कसा आला हें आपणांस कळेलच. आतां त्वरा करावी.

**राजा**—ठीक आहे. प्रधानजी, या वनदेवतेचा व आमचा संवाद झाला तो आपण ऐकलाच.

**प्रधान**—राजाधिराज. मी ऐकला पण हें आश्चर्यकारक प्रकरण काय आहे मला कळत नाहीं.

**राजा**—असो; आतां संशयांत ठेवण्यांत अर्थ नाहीं. या गिरिवर चित्रांगद राजा व त्याची स्त्री यांना सर्पदंश झाला होताना ?

**प्रधान**—होय पण त्याचें काय ? वैद्यानें सर्पाचे विष उतरवून त्यांना पुनः सावध केलें.

**राजा**—छे छे, खरा प्रकार तसा नाहीं. त्या दोघांनाहीं सर्पदंश होताच त्यांचे प्राणोत्क्रमण झाले ?

**प्रधान**-काय त्यांचे प्राणोत्क्रमण झाले! मग हल्लीं त्यांच्या रूपानें आपण आहांत हे कोण?

**राजा**-ऐका सर्व सांगतो-

**पद. चाल. अबला स्त्री ही केवळ ही-**

धनदाचामी प्रधान आहे इंद्रसेन साचा ॥ भार्या माझी इंदुमती ही प्राणचि शरिराचा ॥ मध्यमलोकीं या गिरीवरती वनशोभा बघता ॥ पाहियला स्त्रीसह अहिदंशे भूपति मृत होता ॥ इच्छा झाली तत्शरिरामधि प्रवेश करुनीया ॥ स्त्रीसह या लोकींचे कांहीं दिन सुखसेवाया ॥ १ ॥

नंतर या वनदेवतेला आम्ही आपले प्राण पुनः शरिरांत आणीपर्यंत देहांचें रक्षण कर असें सांगून परकायाप्रवेशिनी विद्येच्या बलानें शरीरांत प्रवेश करितांच पुढला सर्व प्रकार तुह्मांस माहित आहेच.

**प्रधान**—मग महाराज आह्मां विदर्भ नगरीच्या लोकांची ही मोठी पुण्यायीच होती. तरी पूर्वीच्या महाराजांनां सही शिवाय अक्षर काढतां येत नव्हते व आपण त्यांत प्रवेश करि-

तांच पुढें त्यांचे विलक्षण ज्ञान दिसून आले तेव्हां मला मोठेंच आश्चर्य वाटलें. पण ही ईश्वरी कृपा असेल असें ह्मणून स्वस्थ बसलों. आणखी राणीसाहेब, राक्षसकन्या मरतानां मी देवता असून राणीनें माझी निंदा केली ह्मणून तिचा सूड घेण्यास मी सवत झाले हें बोलली तेव्हां कदाचित आमच्या राणीसाहेबानीं तसें केलें असेल. कारण, अशा कनिष्ठ देतांवचा त्या फार तिरस्कार करीत.

**राजा** ते असो. सुदैव योगे आज तुह्मी येथें आहां ही मोठी चांगली गोष्ट आहे तर या वनदेवताच्या आश्रमांत आह्मी आपल्या शरिरांत प्रवेश केला ह्मणजे तुह्मी ह्या राजा व राणी यांच्या शरीरास मोठ्या समारंभानें अग्नि द्या व नंतर तुह्मी नगरींत जा.

**प्रधान**–छे, छे, आतां मी आपणाला सोडून कधीं जाणार नाहीं. नाहीं तर या माझ्या ही शरीराला मी अग्नीला अर्पण करीन. कारण प्रजाजन आपणा सारखे भूपती मिळाले असतां त्यानां पुन: परत जाऊं दिलें याबद्दल मला दोष देतील.

**राजा**–छे छे, प्रधानजी असें साहस करूं नका. निरुपायास्तव आम्हाला आतां या शरीरांत राहतां येत नाहीं. तर

## पद. चाल. नको हरिनिशीही.

विदर्भपुरची प्रजा सर्व ती अनाथ होईल तुह्मि नसता ॥ मग पर नृप कुणि येउनि त्यांची हरण करिल की स्वतंत्रता ॥ मळविल पहिले भूपतियश तो माझे तैसें तुमचें ही ॥ तुम्हा यासम पातक दुसरें वाटे शास्त्रामधिं नाहीं ॥ १ ॥

तर तुह्मी सूज्ञच आहा या साठीं हा सर्व प्रकार प्रजेला कळवून तिचे तुह्मी यथान्याय पालन केले ह्मणजे या लोकींच तुह्माला स्वर्गसौख्यलाभ होईल.

**प्रधान**—आपली आज्ञा जर अशी होत आहे तर ती मला उलंघन करता येत नाहीं. आतां इतकेंच वाईट वाटतें की आपणा उभयतांस या लोकीं आम्हा साठीं फार दुःख भोगावें लागलें.

**राजा**—असे मुळींच मनांत आणू नका आम्हाला तर तुमच्या सहवासानें फारच आनंद झाला. आतां दुःख फक्त मनमोहिनीसंबंधानें; पण तिनें ' मी एका श्रेष्ठ यक्षासी विवाह

केला असें पत्रांत लिहिलें होते तेव्हां आतां ती आम्हा-ला भेटेलच.

**प्रधान**—महाराज आतां आपणास एक गोष्ट सांगाविशी वाटते. ती आपणांस माहीत असण्याचा संभव नाहीं. मन-मोहिनी आपली कन्या नव्हे ?

**राजा**-काय कन्या नाहीं ? तर मग कोण ?

**प्रधान**—ऐकावें सरकार ? महाराज व मी ऐके वेळीं शिकार करीत या गोदेच्या काठीं आलो असतां एक पेढी वाहात येत असलेली पाहिली नंतर ती उघडून आंत पाहिलें तों जि-च्या गळ्यांत एक दिव्यरत्नमाला होती अशी एक कन्या दिसली. तिचेंच महाराजांनीं अपत्य नसल्यामुळें कन्येप्रमाणें पालन केलें. ती माला निरंतर मनमोहिनीच्या गळ्यांत असते. ही हकीगत मी महाराज व राणी साहेब या खेरीज को-णालाही माहीत नाहीं.

**राजा**—पण ती कन्या कोणाची असेल बरें ?

**प्रधान**—त्या संबंधानें आह्माला कांहींच कळलें नाहीं.

**घनदेवता**—ती माझी कन्या सांप्रत आपली स्नुषा झाली आहे.

**राजा**–काय तुह्मी कन्या ? आणि नदींत जाण्याचा संबंध?

**वनदेवता**–ती हकीगत फार मोठी आहे या करितां आपणास आश्रमांत कळेल. आतां लौकर चला.

**राजा**–प्रधानजी, मनमोहिनीची हकीगत ऐकण्याकरितां व या शरिरांचे दहन करण्याकरितां आपणही चला.

**प्रधान**–आज्ञेप्रमाणें मी तयार आहे..

**राजा**–आजचा दिवस किती तरी विलक्षण उगवला–

## साकी.

मिथ्या गोष्टी खरोखरीच्या किति दिसल्या आजवरी ॥
तत्सत्याचा निर्णय होतो अवचित हा आज परी ॥ चरित्र दैवाचें ॥ आहे अघटित कीं साचे ॥

( सर्व जातात )

---

## प्रवेश २ रा वनदेवतेचा आश्रम.

( अमात्यइंद्रसेन, इंदुमती, चूडामणी व वनदेवता प्र. क. )

**इंद्रसेन**––वत्सा, चूडामणी, अशा अल्पवयांत आह्मी तुला सोडून गेल्यामुळें तुला कितीतरी दुःख भोगावें लागलें ?

### पद. चाल. सकलासी रवि प्रिय ही–

शोधाया जननीजनका सकल लोक तूं फिरलासी ॥ चो-

रवनीं गिरिशिखरींही भय सोडुनिया गेलासी ॥ ऊन
मेघ वारा यांचा ताप तो सहन केलासी ॥ चाल ॥
दुर्दैवें इतकें करुनी ॥ तत्फल नच तुजला मिळुनी ॥
धनदानें निष्ठुर वचनीं ॥ दिधलें तुज या शापासी ॥
कांहीं नच आह्मा पासुनि अजवरि सुख मिळलें तुजसी॥ १॥

**इंदुमती**—बाळा, चूडामणी, तूं आणखी मनोरमा मला प्राणापेक्षांही आवडती असतां तुह्मां दोघांची इतकें दिवस ज्यापेक्षां अगदीं मला अठवण देखील राहिली नाहीं; त्यापेक्षां मजसारखी निष्ठुर हृदया या त्रिभुवनांत कोणी नसेल. दैवाची तरी आह्मां सर्वांवर एकदाच कशी इतराजी झली कळत नाहीं कीं आह्मांस जाणूनबुजून मृत्युलोकचें दुःख भोगायास जाण्याची बुद्धि झाली व तुह्मां दोघांस सर्व सुख सोडून अशा लहान वयांत ऋषीसारखे कष्ट व्रत सेवन करणें भाग पडलें.

**चूडामणी**—बाबा, आई, आपणांस इतकें दुःख करण्याचें कारण नाहीं. पुत्रधर्माप्रमाणें आपल्या शोधासाठीं मी सर्वत्र फिरलों यांत विशेष तें काय केलें ? आज माझ्या सुदैवानें आणि या देवीच्या कृपेनें तुमची भेट झाली यापेक्षां मला दुसरी आनंदाची गोष्ट कोणती हावी ? आतां त्या दैवास आमची आणखी करुणा येऊन—

पद. चाल. गंगानदितीं किंवा धीरनथरवे

सांप्रत जैसें अवचित तुह्मी भेटलांत येवोनी ॥ नलकूबर युवराज मित्र मम भेटो मजलागोनी ॥ मनोरमेचें सर्व दुःख तें तेणें विलया जावो ॥ पुत्रागमनें यक्षराज मज प्रसन्न त्यापरि होवो ॥

**इंद्रसेन**—वत्सा, तुज प्रमाणेंच त्याला भेटण्या विषयीं आमचीही उत्कंठा अनिवार झाली आहे. पण सांप्रत त्याची काय हकीगत आहे हें जाणण्यास मार्ग नाहीं—

साकी.

आह्मांसम तो परकायेमधिं शिरला कां लीलेनें ॥ किंवा तुजसम दुःखचि भोगी कोणाच्या शापानें ॥ कुतर्क बहु येती ॥ त्याविषयीं बा ममचित्तीं ॥ १ ॥

**चूडामणी**—तो कोणत्या स्थितींत असेल तें असो. पण कसाही तो मला येऊन भेटला पाहिजे. पहा—

साकी.

धनदाचा तो शाप पूर्ण मम आजदिनीं जरि होतो ॥ प्राणमित्र नलकूबर येउनि जोंवरि नच भेटे तो ॥ निज सदनीं जाया ॥ उत्सुकता नच मन्मनिं या ॥ १ ॥

**वनदेवता**—वत्सा, कोणत्याही गोष्टींत धीर हा धरलाच पाहिजे व तोच उत्तम फल देतो तर हें लक्षांत ठेवून तूं आपल्या मातापितराबरोबर आतां अलकावतीस जा. जसे हे भेटले तसाच तोही तुला येऊन भेटेल.

**इंद्रसेन**—वनदेवते, तूं योग्य सांगितलेंस व तें आह्मी ऐकलेंही पाहिजे. कारण तुझे आह्मावर किति तरी उपकार झाले आहेत पहा–

**पद. चाल. पाहिन सिंहासनिं.**

काळजिनें तूं अमुच्या निर्जिव या देहांना रक्षुनी ॥
पुनरपि त्या मधिं तत्प्राणांना आणिशि ओळख देउनी॥
चूडामणिला अर्पिसि प्रेमें निजकन्या मनमोहिनी ॥ संकट आह्मां वाटे ह्मणुनी जाणें तुजला सोडुनी ॥ १ ॥

**इंदुमती**—वनदेवते, आजपर्यंत मी तुला बरोबरीची मैत्रिण समजत होतें. पण दैवानें तर तुला माझी विहीण केली.

**वनदेवता**—ह्मणूनच तर आज तुमचें आर्जव करणें मला भाग पडत आहे. आतां इतकेंच मागतें कीं मुलीला कधींही जाच करूं नका व तिला एकवार बघण्याविषयीं मला उत्कंठा लागली आहे पण नियमाप्रमाणें मला तिकडे येता येत नाहीं तर कसेंही करून तिला कांहीं दिवस इकडें पाठवून द्या.

**इंदुमती**-प्रियसखे, हें तूं कांहीं मला सांगावयाला नकोस. पूर्वी तर ती माझी कन्याच होती व हल्लीं जरी सून झाली तरी तिजवरचें माझें प्रेम कांहीं कमी झालें नाहीं. आतां मी गेल्यावर लौकरच तिला तुला भेटावयाला पाठवून देईन.

**वनदेवता**-( समोर पाहून ) अगबाई ! पण हा काय चमत्कार ? ज्याच्या तेजानें सर्व दिशा प्रकाशित झाल्या आहेत अशा दिव्य विमानांत बसलेले हे कोण बरें इकडेच येत आहेत.

( सर्व आश्चर्यचकित होऊन पाहतात )

(तदनंतर विमानांत बसलेले नलकूबर, मनोरमा, मनमोहिनी, व एक सेवक इतके प्र. क.)

**चूडामणी**—कोण ? माझा प्रिय मित्र नलकूबर ! ( भेटून ) मित्रा, खरोखर तूंच आहेस कारे ? कां मी हें स्वप्न पहात आहे ? छे स्वप्न नाहीं. हा माझा मित्र !

**मनोरमा**—आणखी, हे कोण ? माझी आई व बाबा !

**इंद्रसेन—इंदुमती**—ये मुली, अगोदर आम्हांला भेट. आम्हांसाठी आजपर्यंत तुला किती तरी दुःख झालें ?

**नलकूबर**—कोण ? अमात्य इंद्रसेन ? आर्या, मी आपणा उभयतांस अभिवंदन करितों.

**इंद्रसेन**—वत्सा, चिरायू हो. आज तुझी आमची भेट झाली. केवढा आनंदाचा हा दिवस.

**मनमोहिनी**—( दोघांस ) मी आपणा उभयतांस प्रणाम करितें.

**इंदुमती**—मुली, अखंड सौभाग्यवती हो. मी तुझी पालन कर्त्री माताच आहे तर अगोदर मला भेट आणि तुझ्या भेटी विषयीं उत्सुक झालेली जी ही तुझी खरी माता वनदेवता तिला नमस्कार कर.

**मनमोहिनी**—( तसें करून भांबावते )

**इंद्रसेन**—मुली भांबावून जाण्या सारखा हा तुला प्रकार वाटतो आहे खरा; तथापि तुला सर्व सांगतों तें नीट ऐक—

पद. चाल. कपटानृत भूमी.

तेजोनिधि सविता ॥ आहे मुलि तव जाण पिता ॥धृ०॥
कौमार्यामधिं इस त्यापासुनि ॥ तनया झालिस तूं मन-
मोहिनि ॥ परि ईनें तुज पेटिंत घालुनि ॥ नदिमधिं
टाकिली असतां लागुनि ॥ चित्रांगदहाता ॥ त्यानें
मानिलि तुज दुहिता ॥ १ ॥

असा हा खरा प्रकार आहे. पुढें चित्रांगद राजा व त्याची स्त्री या रामगिरीवर सर्पदंशानें मृत झाली व त्यांच्या शरीरांत आह्मी उभयतांनीं प्रवेश केला व विदर्भ नगरीचें पालन करून

तुझें संरक्षण केलें. आतां तुला राक्षसाला देण्याचें ठरवून दुःख दिलें तर त्याबद्दल आम्हांवर कोप करूं नकोस.

**मनमोहिनी**–( मनांत ) अगबाई !

पद. चाल. वाट तुझी आदेरही.

देव करी खेळ कसा तरि माझा आजवरी ॥ देव-कुळीं देउन जनु मज धाडी भूमिवरी ॥ यक्षवरा अर्पु-नीया मग त्यासी धन्य करी ॥ माय सामु जाहलि हें नवल असे काय तरी ॥ १ ॥

तरी माझ्या गळयांतली दिव्यरत्नमाळा पाहून सर्व लोक ही मानव कन्या खरीच आहे कीं काय या विषयीं संशय घेत असत. ( वनदेवतेस ) आई, दैवानेंच आज तुझी माझी भेट केली म्हणावयाची.

**वनदेवता**—मुली, किति तरी निर्दय मी ! तुझ्यासारखी कन्या झाली असतां तिजविषयीं मी असें भयंकर वर्तन केलें ! असो. झाल्या गोष्टीबद्दल आतां खेद करून काय उपयोग ? बाळे, यापुढें तुला किंचित् देखील दुःख होणार नाहीं बरं. तर मी तुला जें दुःख दिलें तें यावर मनांत ठेवूं नकोस.

**मनमोहिनी**—आई, मी होताक्षणींच तुझा माझा वियोग

व्हावा असा दैवाचाच विचार होता ह्मणून तूं तसें केलेंस याचा तुजकडे काय बरं दोष ?

**नलकूबर**—प्रधानजी, एकूण चित्रांगद राजा व त्याची स्त्री आपण उभयतांच झाला होता तर.

**इंद्रसेन**—वत्सा, पूर्वींच्या पापामुळें तेथें दुःख भोगण्यास अथवा पुण्यामुळें अशा सद्गुणी कन्येचें पालन करण्यास जाण्याची परमेश्वरानें आम्हांला बुद्धि दिली.

**चूडामणी**—बरें पण मित्रा, तूं आजपर्यंत कोठें होतास ?

**नलकूबर**—अरे दुसरा कोठें असणार ? ज्याठिकाणीं अमात्य जाऊन राहिले होते तेथेंच मी निरंतर होतो पहा—

## साकी.

श्यालक त्यांचा महामायसुत राक्षस कीं जो हो-
ता ॥ या मनमोहिनिसाठीं पावे तव हस्तानें अंता ॥
तो तव मित्र पहा ॥ होता प्रिय नलकूबर हा ॥ १ ॥

आतां मी राक्षस होण्याचें कारण काय ह्मणून विचारशील तर—एके वेळीं मी मनोरमेशिवाय एकटाच चैत्ररथोद्यानांत बसलों असतां प्रभातकाल होऊन नुकताच भगवान् सहस्त्ररश्मी उदयास आला होता त्या वेळीं मी मद्यप्राशन करून धुंद झाले-

लों असल्यामुळें त्याला नमस्कार न करितां मनोरमेलाच उद्देशून आपणाशी बोलत होतों म्हणूनच त्यास कोप येऊन तो म्हणाला कीं—

## दिंडी.

उदयकालीं ज्या वंदितात सारे ॥ काय विपरित त्या पुढें बोलसीरे ॥ तरी माझा घे तुला शाप हा कीं ॥ फिरे राक्षस होउनी मर्त्यलोकीं ॥ १ ॥

मित्रा, दिनमणीनें दिलेला हा शाप ऐकतांच माझी सर्व धुंदी उतरली मग मजवर दया करण्याविषयीं मी त्याला विनंती केली असतां बारा वर्षांनीं तुझी त्या योनींतून मुक्तता होईल असा त्यानें मला उःशाप दिला.

( सर्व हें वर्तमान ऐकून आश्चर्य करितात.)

**चूडामणी**—तर मग मित्रा—

### पद. चाल. काय मला भूलही.

अज्ञानें ओळख तव राहिलि न मला ॥ म्हणुनी मी दिव्य शरें मारिलें तुला ॥ धृ० ॥ या मनमोहिनिवरि तव मन असोनिया ॥ केलें तिस निज दयिता बघ वरोनिया ॥ तरि यावरि तें कांहीं मनिं धरोनिया ॥ कोप न करी मुळिं मजवरि जाण आपुला ॥ १ ॥

**नलकूबर**—छे, छे, मित्रा, तूंच त्या पापयोनींतून माझी मुक्तता केलीस हा तुझा मजवर उपकार झाला असतां त्याविषयीं माझा तुजवर कधीं तरी कोप होईल काय ? आतां मनमोहिनी संबंधानें म्हणशील तर ती मीच तुला मोठ्या आनंदानें देतों. मग झालें कीं नाहीं ?

**मनमोहिनी**—( मनांत ) युवराजांचें चरित्र ऐकून मला जी मोठी भीती वाटून राहिली होती ती हें त्यांचें भाषण ऐकून सर्व नाहींशी झाली.

**नलकुबर**–सेवका, आतां तूं अगोदर अलकावतीस जाऊन तातानां हें सर्व वर्तमान कळवून त्यांच्या भेटीसाठीं आम्ही सर्व जण आलों असें सांग.

**सेवक**–आज्ञा–( असें ह्मणून जातो )

**नलकूबर**-कां अमात्य, आतां महाराजांच्या भेटीस चलावयाचें नां ?

**इंद्रसेन**–हो हो, आतां उशीर कशाला ? त्यांच दर्शन घेण्याविषयीं आह्मांस फार उत्कंठा लागली आहे. वनदेवते, आतां आह्माला जाण्या विषयीं तुझा निरोप मिळावा.

**वनदेवता**–यावर देवानें कोणाला अशा भयंकर प्रसंगांत

घालूं नये ही त्यापाशीं प्रार्थना आहे. आतां आपण आनंदानें यक्षराजाच्या भेटीस जावें.

**मनमोहिनी**--आई, पुनः तुझा माझा वियोग होण्याची वेळ आली नां ? --

पद. चाल. ठेऊं देह कशालाही.

दैव किती निष्ठुर हे ॥ आहे ॥ धृ० ॥ तूं मन्माता कळलें नुकतें ॥ तोंचि तुला मी सोडुनि जातें ॥ देशिल यावरि कधिं भेटीते ॥ काळजि बहु मन वाहे ॥ १ ॥

**वनदेवता**—बाळें, फिरून तूं मला लौकरच भेटशीलबर. आतां अशा आनंदाच्या वेळीं मनांत कसलेंही दुःख न ठेवतां आपल्या पतिबरोबर जा व तेथें सर्वांची आवडती हो.

**इंद्रसेन**--सर्वजण बसा विमानांत. ( तसेंकरून ) अहाहा !

साकी.

यक्षेश्वर चरणांचें दर्शन आतां झाल्यावरती ॥ दुरितें लय पावुनि होइल कीं आनंदाची भरती ॥ कसलीही चिंता ॥ जळुनी राहिल नच चित्ता ॥ १ ॥

( सर्व जातात )

---

## प्रवेश ३ रा अलकावतींतील राजगृ[illegible]

( स्त्रीसह सिंहासनस्थ कुबेर व सेवक प्र. क. )

**कुबेर**—प्रिये, भगवान् शंकरांनीं मनोरमेला वरप्रदान दिल्याप्रमाणें आपला पुत्र तर आपणांस पूर्वींच भेटला व आतां स्त्रीसह अमात्यइंद्रसेन भेटणार हें वर्तमान ऐकून मला कितीतरी आनंद झाला आहे म्हणून सांगूं ? पहा—

### पद. चाल. तुझा तनय जोही.

त्या सचिवाला पहावयाला मी अपुल्या लोचनीं ॥ झालों उत्कंठित बहु मनीं ॥ विस्मय वाटे किंतितरि त्याचे चरित्र तें ऐकुनी ॥ कैसी प्रभुमाया मोहिनी ॥ कसलीही नच चिंता अपुणा राहियली यावरी ॥ केली कृपाचि विधिनें पुरी ॥ १ ॥

**देवी**—इंदुमतीबाई गेल्यापासून आजपर्यंत मला कसें तें मुळींच करमेनासें झालें होतें पण आतां त्यांच्या चरित्राचा कितीएक दिवस मी आपल्या करमणुकीचा विषय करीन.

**कुबेर**—सेवका, ते सर्वजण केव्हां येतों म्हणालेरे ?

**सेवक**—राजाधिराज, तुझ्यामागून आम्ही लागलीच येतों असें युवराजांनीं मला म्हटलें; तेव्हां बहुश: ते आतांच येतील.

**कुबेर**—बरें तर आज सर्व यक्षांस पूर्ण विश्रांती घेण्या विषयीं माझी आज्ञा आहे असें कळीव व आणखी—

**पद. चाल. अप्रतिरथहा ही.**

मनमुराद तें मंदिरांत मम सोमपान सकलांनीं ॥ करुनी स्त्रीसह क्रीडा करण्या जावें कीं उद्यांनीं ॥ उत्सव मंगलकर बहुपरिचे करावेंचि निज सदनीं ॥ या योगें तो होइल हर्षचि बहु आह्मां लागोनी ॥ इच्छा अशि अमुची ॥ कळवी सकळांना साची ॥ १ ॥

**सेवक**—आज्ञे प्रमाणें करितो. ( जाऊन पुन: येऊन ) राजाधिराजांची ही इच्छा ऐकून आज सर्व अलकावतीच आनंदानें डोलूं लागली आहे कीं काय असें वाटतें. आणखी हें पहावें. अमात्यादि सर्वजण देवाधिदेवांच्या दर्शनास आले.

( इंद्रसेन, इंदुमती, नलकूबर मनोरमा चूडामणी व मनमोहिनी प्र. क. व त्या उभयतांस प्रणाम करितात )

**कुबेर**—सर्वांनीं आसनावर बसावें. ( सर्व बसतात )

**इंद्रसेन**—देवाधिदेवांची पूर्ण कृपा ह्मणूनच पुन: हे चरण आज पाहिले.

**कुबेर**—अहो अमात्य, आपण एकाएकीं नाहींसे झाल्या-

मुळें ही अलकावती शून्यवत् झाली होती पण परमेश्वरानें पुनः आपणांस आणून आज तिचा भाग्योदय केला.

**देवी**–कां इंदुमती बाई, मृत्युलोकच्या राजसुखानें कृतकृत्य झालात ना.

**इंदुमती**—मी देवीची फार अपराधी आहे तरी आतां त्याची देवीनें मला क्षमा करावी.

**कुबेर**–दैवानें कोणासही सोडलें नाहीं तेव्हां या प्रत्येकांस जें जें दुःख भोगावें लागलें त्याचा त्यांच्याकडे काय दोष !

( चूडामणीस ) वत्सा, अगोदर मला भेट. तूं फार श्रम केले असतांही मी तुला शाप देऊन दुःख भोगावयाला लाविलें याचें आतां मला फार वाईट वाटत आहे.

**चूडामणी**–महाराजांचें मन पुनः मजविषयीं चांगलें झाल्यामुळें शापाचें किंचितही दुःख माझ्या मनांत राहिलें नाहीं इतकेंच नाहीं तर त्यायोगानें त्या परोपकारी वनदेवतेची व मातापितरांची भेट झाली यामुळें मला त्याचा आनंदच होत आहे. आतां महाराजांच्या चरणापाशीं इतकीच विनंती आहे कीं ही माझी स्त्री मानवकन्या नसून भगवान् सहस्ररश्मीची कन्या आहे हें महाराजांस विदित झालेंच आहे. तर आपणां यक्षांस ही अंगिकार करण्यास योग्य आहे असें जाणून महाराजांचा तिजवर कधीं कोप नसावा.

